


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



८।२५ २६८८

अं. २५.२६.२८.२९

वर्ष ७ वे जानेवारी १९३४ अंक १ ला

वर्ष ७ वे एप्रिल १९३४ अंक २ रा ३ रा नाही

" " ऑक्टोबर १९३४ अंक ४ था

" " जानेवारी १९३५ अंक ५ वा

वर्ष ७ वे जुलै १९३४ अंक ३ रा नाही.



॥ श्री ॥






महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष सातवें ] पौष शके १८५६ [ अंक पांचवा

जानेवारी १९३५



संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए.



वार्षिक वर्गणी ट. ह. सह रु. ४-८ फुटकळ अंकास १ रु. ट ख. निराळा






अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अधिकारी व अधिकारी मंडळें

### ट्रस्टी

प्रो. दामोदर गणेश पाध्ये, एम्. ए., जे. पी., एच्. पी. टी. कॉलेज, नाशिक.
डॉ. नी. भा. भाटवडेकर, एम्. बी. बी. एस्., चर्नी रोड, मुंबई (४).

### अध्यक्ष

श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे, एम्. ए., सरस्वतीनिकेतन, इन्दूर.

### उपाध्यक्ष

प्रो. वामन मल्हार जोशी, एम्. ए., हिंगणें बुद्रुक, पुणें (४).
श्री. नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए., एलएल्. बी., टिळक रस्ता, पुणें (२).
प्रो. पांडुरंग वामन काणे, एम्.ए., एल्एल्.एम्., आंग्रेवाडी, गिरगांव बॅक रोड, मुंबई(४).
श्री. चिंतामण विनायक वैद्य, एम्.ए., एल्एल्. बी., गिरगांव बॅक रोड, मुंबई (४).

## कार्यकारी मंडळ

### कार्याध्यक्ष

रा. सा. नारायण गोविंद चापेकर, बी. ए., एलएल. बी., बदलापूर (जि. ठाणें).

### खजिनदार

प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ, एम्. ए., एम्. लिट्., डेक्कन जिमखाना, पुणें (४)

### चिटणीस

प्रो. देविदास दत्तात्रेय वाडेकर, एम्. ए., फर्ग्युसन कॉलेज, पुणें (४).
श्री. केशव नारायण काळे, बी.ए.,एल्एल्. बी., पुणें (१).

### 'म. सा. पत्रिका' संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए., १८० शनवार, पुणें (२).

### सामान्य सदस्य

प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., एम्. ओ. एल., हिस्लॉप कॉलेज, नागपूर.
श्री. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, एम्. ए., बी. टी., मंगळवार पेठ, सातारा.
श्री. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए., महाराष्ट्र शब्दकोश कचेरी, पुणें (२).
रे. भास्कर कृष्ण उजगरे, सासवड (जि. पुणें).
श्री. राजाराम दामोदर देसाई, बी. ए., ३१३ सदाशिव पेठ, पुणें (२).

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, वर्ष ७ वें (शके १८५६)

# विषयानुक्रमणिका

## शंका, चर्चा, समाधान



## साहित्य व साहित्यिक

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, वर्ष ७ वें (शके १८५६)

# लेखकानुक्रमणिका

अनुक्रमणिका

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेली

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ७ वें, अंक ५ वा.

## अनुक्रमणिका



---

# सभासदांस व वर्गणीदारांस विनंती

बऱ्याच सभासदांकडून चालू सालची वर्गणी (रु. चार, आणे सहा) अजूनहि येणें आहे. याबद्दल सभासदांकडे 'पत्रिके'मार्फत व स्वतंत्र कार्डांने सूचना पूर्वी रवाना झालेल्या आहेत. तरी सभासदांनी आपापली वर्गणी लवकर पाठविण्याची कृपा करावी अशी विनंती आहे.

परिषदेचें वर्ष पूर्वी जानेवारी ते डिसेंबर असें धरलें जात असे. तें आता नवीन घटनेंतील वर्षगणनेच्या नियमाप्रमाणे एप्रिल ते मार्च धरावें असें ठरल्याने या नियमाच्या प्राथमिक पूर्ततेसाठी चालू वर्ष जानेवारी १९३४ ते मार्च १९३५ असें पंधरा महिन्यांचें धरण्यांत आलें आहे. यामुळे 'पत्रिके'चे या वर्षाचे अंक चाराच्याऐवजी पांच धरावे लागून वर्गणीहि किंचित् अधिक धरावी लागली आहे. एप्रिल १९३५ पासून मात्र वर्षगणना १२ महिने व वर्गणी रु. तीन, आ. आठ हीं नेहमीप्रमाणे होतील.

तरी विनंती अशी की, सभासदांनी आपली वर्गणी बाकी ठेवूं नये. वर्गणी बाकी रहात गेली म्हणजे ती पुढे देणें जड जातें. तरी वेळींच ती देण्याचें करावें अशी सूचना आहे.

'पत्रिके'च्या वर्गणीदारांनीहि वरील गोष्टी ध्यानीं घेऊन आपापली वर्गणी (प्रत्येकीं रु. पांच, आणे दहा) लवकर पाठवावी अशी त्यांस विनंती आहे.

हल्लीच्या सभासदांचा व वर्गणीदारांचा परिषदेवरील लोभ त्यांनी पुढील वर्षींहि तसाच कायम ठेवावा अशी त्यांस विनंती आहे. तथापि ज्यांस पुढील वर्षीं सभासद किंवा वर्गणीदार राहणें शक्यच नसेल त्यांनी तसें रीतसर वेळींच म्हणजे वर्षारंभापूर्वीच इकडे कळवावें अशी विनंती आहे.

परिषदेची कचेरी,<br>
टिळक रस्ता,<br>
पुणें (२).<br>
ता. ६।२।१९३५.

चिटणीस, म. सा. परिषद्

---

## नूतन भावंडांचें स्वागत

'सह्याद्रि', पुणें, 'ज्ञानमंदिर', मुंबई, व 'महाराष्ट्र शारदा', मुंबई हीं मासिकें 'पत्रिके'स प्रत भेट म्हणून येऊं लागलीं आहेत. आमच्या या नूतन भावंडांचें आम्ही हार्दिक स्वागत करितों.

—संपादक—

अनुक्रमणिका

शंकराचार्यामुळे शैवमतास जोर आला. महाराष्ट्रांत मुळांत असलेल्या भागवतमतास हस्तामलक व चित्सुखादि आचार्यांमुळे जोर आला. परंतु जैनांनीहि आपल्या हरिवंश-काव्यांची व नेमिनाथपुराणांची झोड संस्कृत, प्राकृत व अपभ्रंशांतून सुरू ठेवली. विदर्भाच्या सुधन्व्यास साम्राज्यप्रतिष्ठापनाचार्य द्वारावतीपीठाधीश्वर शंकराचार्यांकडे महाराष्ट्र व गुजराथ भाग आला; आंध्रकर्नाटकादि भाग शृंगेरीमठाकडे आला. परंतु शंकराचार्यांचें मुख्य पीठ शृंगेरीस कर्नाटकांतच होतें. अशा रीतीने पुनः कर्नाटकाचा महत्त्वाचा दर्जा मान्य केला गेला. असो, क्रिस्ताब्द १० वें शतक हें कानडी जैनवाङ्मयाचें सुवर्णयुग होय. पंप, होन्न आणि रन्न हे तिघे कविचक्रवर्ति; आदिपुराण, शांतिपुराण व अजितपुराण हीं तीन जैनसमाजवंद्य पुराणकाव्यें; शूद्रक, विक्रमार्जुन विजय, भुवनैकरामाभ्युदय, साहसभीमविजय अथवा गदायुद्ध, परशुरामचरित्र इत्यादि ऐतिहासिक काव्यें; जगत्प्रसिद्ध गोमटेश्वर मूर्तीचा प्रतिष्ठापक चाऊंडराय याचा त्रिषष्टिशलाकापुरुषपुराण हे सर्व ग्रंथ याच काळांत लिहिले गेले. गंग, राष्ट्रकूट व मांडलिक चालुक्य यांच्या दरबारीं कानडीस मान्यता होती येवढेच नव्हे, तर राजसभेंत कविचक्रवर्ती म्हणून कानडी कवींचा वैभवाने सन्मान होत असे व त्यांना विशिष्ट स्थानहि होतें. या शतकाच्या प्रत्येक विंशकांत एकेक महाकवी झाला. ९०० त महाकवि पंपाचा परमगुरु गुणनंदी याने लिहिलेलें काव्य मिळत नाही; परंतु त्याचें संस्कृत व्याख्यान मिळतें. ९२० त पहिल्या गुणवर्म्याने गंगाचे दरबारीं शूद्रककाव्य लिहिलें. यांतील २००–३०० श्लोक 'काव्यसार' अथवा 'सूक्तिसुधार्णवा' सारख्या वेच्यांच्या संग्रहांतून मिळतात. यामुळे गंगाच्या कोणत्या विजयाला अनुलक्षून हें लिहिलें हें कळण्यास स्पष्ट मार्ग नाही. ९४० च्या सुमारास पंपमहाकवीचा 'विक्रमार्जुनविजय' प्रसिद्ध झाला. त्यांत चालुक्य अरिकेसरीने राष्ट्रकूट गोज्जिगराजापासून चालुक्य विनयादित्याचें रक्षण केल्याचा इतिहास गर्भित आहे. पंपसमकालीन रेवाकोट्याचार्याने वड्डाराधन हा जैनकथासंग्रह लिहिला; त्यावरून दक्षिणेंत जैन पहिल्या चंद्रगुप्ताच्या वेळीं नव्हे तर संप्रति चंद्रगुप्ताच्या वेळीं आले असे कळून येतें. व ९६० इसवी सनांत राष्ट्रकूट कन्नरदेवाने राजराजचोळाचा 'तक्कोळम्' येथे जो वध व पराभव केला व कांची शहर काबीज केलें त्याचें वर्णन होन्न महाकवीने केलें असावें असें तक्कोळविजयाचीं जीं वर्णनें शासनकाव्यांतून येतात व भुवनैकरामाभ्युदयाचे जे तुटक श्लोक व्याकरणालंकार ग्रंथांत मिळतात त्यांवरून वाटतें. ९८० या सनांत चावुंडरायाचें महापुराण प्रसिद्ध झालें व १००० च्या सुमारास कविचक्रवर्ति रन्नाने चालुक्य तैलप व इरिवबेडग सत्याश्रय या पितापुत्रांनी चोळांचा जो धुव्वा उडविला त्याचें वर्णन भीम व दुर्योधन यांच्या गदायुद्धाच्या रूपाने केलें. एकूण या शंभर वर्षांत कानडी महाकाव्यें संस्कृत पंचमहाकाव्यांच्या तोडीची झाली. रविनागभट्ट आणि कविराजराज या वैदिक ब्राह्मण कवींनी लिहिलेलीं उत्तम शासन काव्यें उपलब्ध आहेत. महाकाव्यें नाहीत.

या युगांतील तिसरा खंड मुकुंदराजाच्या काळाशीं जाऊन भिडतो. याच काळांत ब्राह्मणांचें लक्ष 'मरहाटी' कडे वळविणारी धार्मिक चळवळ महाराष्ट्रांत सुरू होती. राजकीय कारणामुळे देवगिरीकर सेऊण मराठी ब्राह्मण व क्षत्रियजातींचा पुरस्कार करितात. कर्नाटकांत राजप्रतिष्ठा न मिळालेला अद्वैतमतमार्ग भागवतमतद्वारे महाराष्ट्रांत व शैवमतद्वारे तेलंगणांत प्रतिष्ठा मिळवूं पहातो. तेलगू भाषेंतील पहिला व्याकरणकार व महाकवि नन्नयभट्ट हा कानडी महाकवि व दंडनायक गजांकुश नारायणभट्ट याच्या साहाय्याने तेलगू भारत लिहितो. चोळचालुक्यांच्या झटापटींत तेलंगणांतील चालुक्यांची भाषा वैशिष्ट्य मिळवून स्वतंत्र होऊं पहाते. तामीळ चोळांनी वेंगी चालुक्यांना वरचेवर जावई बनवून कर्नाटक चालुक्यांपासून फोडलें. महाराष्ट्रांत सेऊण यादवांना मराठीकडे मन वळविण्यास काळ लागला. परंतु जैनांनी 'ओंनमः सिद्धं' या मंत्राने जैन महाराष्ट्रींतून 'मरहाटी' ओनामा सुरू केला असला पाहिजे असें गोमटेश्वरावरील 'चाउंडराये करवियले' या वाक्याने वाटतें. तो इतिहास कानडी वाङ्मयाच्या इतिहासावरून कसा स्पष्ट होतो हें पाहूं.

रन्नकवीच्या गदायुद्धांत वर्णिलेल्या चोळांच्या पराभवाने ते चिडले व १००४ या सनांतच राजचोळाने जैनांविरुद्ध शैवांचें धार्मिक युद्ध पुकारलें व धारवाड जिल्ह्यांतील अण्णिगेरीपर्यंत येऊन जैनांच्या अनेक देऊळांचा नाश केला. यांत चोळांना कांही मोठा विजय मिळाला असें झालें नाही; परंतु शैवधर्माला चेव आला. वाणकादंबरी काव्यरूपाने लिहिणारा नागवर्म, वसुभागभट्टाच्या पंचतंत्रावरून कानडी पंचतंत्र लिहिणारा दुर्गसिंह, कामशास्त्र, अलंकारशास्त्र व छंदःशास्त्र एकत्र लिहिणारा 'मदनतिलका' चा कर्ता चंद्रराज, अद्वैती नागवर्माचार्य वगैरे शैव ब्राह्मण कवि पुढे आले. गजांकुश नारायणभट्टाचें काव्य उपलब्ध नसले तरी इतर कवि त्याची जी स्तुति करितात त्यावरून त्याने त्या वेळीं वाङ्मयांत बरेंच काम केलें असावें असें दिसतें. प्रचंड अद्वैती जीवन्मुक्त गुणगळमुनीवरील जें शासनकाव्य शिकारीपूर शिलालेखांत मिळतें त्यावरून अद्वैत्यांच्या चलतीचा काळ येऊं लागला होता असें दिसतें. या शतकांत नांवाजलेले असे तीनच जैन साहित्यक आहेत. इ. स. १०४९ त 'जातकतिलक' हा कानडी भाषेंतील पहिला ज्योतिषग्रंथ चालुक्यांचे राजवटींत लिहिणारा श्रीधराचार्य आर्यभटाच्या सूर्यसिद्धांताचा अनुवाद करतो. भास्कराचार्य अद्याप जन्मास आला नव्हता. ग्रंथ ज्योतिषशास्त्राचा असला तरी पदपूरणाकरिता चवैतुहीचा आधार न घेतां, प्रासाकरितां वृथाक्षरे न आणता ग्रंथ लिहीन अशी हा प्रतिज्ञा करतो आणि ग्रंथ वाङ्मयदृष्टीने तसा बरा आहे. याचें चंद्रप्रभपुराण अजून सापडलें नाही. हा धारवाड जिल्ह्यातील नरगुंदचा राहणारा होता. वनवासी प्रांतांतील शांतिनाथ कवीने 'सुकुमारचरित' हें महाकाव्य लिहिलें. त्यांत जें 'पद्ळी' नांवाचें वृत्त येतें त्याचा व मराठींतील कांही अभंगांच्या रीतीचा कुलसंबंध असावा असें वाटतें. असो. याशिवाय दिवाकरनंदीचें तत्त्वार्थसूत्र व्याख्यान व शंखवर्म्याचा एक अलंकारग्रंथ हेच नांव

घेण्याजोगे ग्रंथ या काळीं झाले. काळामुख पंडिताचा प्रभाव जनतेवर होता यास शासनकाव्यांतून शेंकडो प्रत्यंतरें मिळतात. यांच्या नांवाच्या कडेला शक्ति, राशी आणि जीया असे शब्द येतात. महाराष्ट्रांतील बाळाजी, शिवाजी, शहाजी अशा कांही नांवाच्या कडेस येणारा जीकार हा त्या संस्काराचा अवशेष असावा असें वाटतें.

यो चालुक्यांचीं व माळव्याच्या राजांचीं अनेक युद्धें होत. महाराष्ट्र देशास स्वतंत्र असें महत्त्व फार थोडें होतें. पंपकवीच्या आदिपुराणावरून चालुक्यांच्या महासैन्यांत वराटांची व महानाटकाची पथकें होतीं असें कळून येतें. हे वराट व महानाटक युद्धोपजीवी मराठे असण्याचा बराच संभव आहे. कांही असले तरी या माळव व चालुक्यांच्या युद्धांत महाराष्ट्रांतील सामंत मांडलीक तटस्थ वृत्तीचे होते अथवा वेळ येईल तसे वागणारे होते असें वाटतें. नाथसांप्रदायप्रवर्तक मत्स्येंद्र याच काळीं कर्नाटकांत संचार करीत असावा. त्याच्यामुळे मराठी भाषेला नाथपंथीयांत महत्त्व आलें असें गोरख-गहिनीनाथादिकांच्या नांवावर मोडल्या जाणाऱ्या ग्रंथांवरून व मुकुंदराज व ज्ञानेश्वरादि संतांच्या काव्यावरून वाटतें.

नाथपंथाला कर्नाटकांत थारा मिळाला नाही व जैनधर्माची उचलबांगडी कर्नाटक,महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांत का झाली हेंच आतां आपण पाहूं. शककर्त्या चालुक्य विक्रमाच्या राजवटींत शैवधर्माला जोर आला; काळामुखांचें प्रस्थ माजलें होतें; यांनी शांकरमायाद्वैत मताचा विरोध केला; व शक्तिविशिष्टाद्वैत प्रतिपादिलें; या काळामुखांत काश्मिरी पंडीत बरेच असत. दक्षिणेंत होय्सळ यादवांच्या राज्यांत रामानुजाचार्यांनी श्रीवैष्णव मत प्रतिपादिलें आणि विष्णुवर्धनांनी जैन धर्म सोडल्यामुळे त्यांच्या परम प्रतिष्ठेला भंग आला. एकांतरामय्य सिद्धराम, महादेवियक्का, बसवेश्वर, चैन्नबसव, मायिदेव, मुक्तायक्का, अल्लमप्रभु इत्यादि वीरशैव भक्त आणि भक्तिणींनी जैनधर्माचीं पाळेंमुळें हुदरून सोडलीं. यावेळीं जैन काय करीत होते हें पाहूं. पंपकवीचाच प्रति अवतार असा अभिनव पंप नागचंद्र याने जीं काव्यें लिहिलीं तीं शांतरसाचींच लिहिलीं. राजाश्रय कमी होऊं लागला होता हें या एका लक्षणावरूनहि दिसण्याजोगें आहे. ब्रह्मशिव, वृत्तविलास या जैनकवींनी शांत व वीररसांना बाजूस ठेवून हास्यरस हातीं धरला व शैव, वैष्णव, व वैदिक धर्मांची टवाळी करण्याचें व्रत धरलें. नयसेन नीतीच्या गोष्टी सांगूं लागला आणि नेमिचंद्र या महाकवीने आपल्या काव्यांत श्रृंगारास अभिषेक केला. जगदळ सोमनाथांनी वैद्यक ग्रंथ लिहिला. दुसऱ्या चाऊंडरायाने सामुद्रिक उदकार्गळादि लोकोपकारक कलांविषयी ग्रंथ लिहिण्याचें योजिलें. दुसऱ्या नागवर्माने अलंकार, छंद, व्याकरण आणि निघंटु या शब्दार्थसाहित्यावर भर दिला. कीर्तिवर्म्यांनी गौवैद्यकावरच ग्रंथ सिद्ध केला. ११२० या काळच्या राजादित्यांनी ६–७ ग्रंथ लिहिले पण सर्व गणितशास्त्रावर· कंती या कवियित्रीने प्रहेलिकासुभाषितादि क्षुद्र काव्यांवर भर दिला. आणि दुसऱ्या कर्णपार्यांनी केवळ नेमिनाथ पुराण लिहिलें. लौकिक इतिहासकाव्य लिहिलें नाही.

जैनांची ही वाङ्मयांतील कामगिरी कमी योग्यतेची आहे असें नव्हे. परंतु

त्यांचें राजकीय महत्त्व कमी झालें होतें व धार्मिक महत्त्वास उतरती कळा आली होती. याच्या उलट चालुक्यांविषयी कानडी काव्यरूपांत ब्राह्मण कवींनी लिहिलेली शेकडों शासनकाव्यें त्यांची चढती कळा दाखवितात. अपराकांनीं कोंकणांत व *विज्ञानेश्वरांनी कर्नाटकांत स्मृतींना टीका लिहून त्यांचें पुनः महत्त्व स्थापण्याची खटपट चालू केली होती. परंतु त्या काळच्या सर्व चळवळींत वीरशैवांची धार्मिक चळवळ सर्वांत जास्त श्रेष्ठ ठरली. वचनें, गीतें, संवाद, पंचीकरण ज्ञानबोधक वेदांत ग्रंथ, या वीरशैव लिंगायितांनी पुष्कळ लिहिले. या पूर्वी जैन पंडितांनी तिरस्कारिलेले अथवा कमी महत्त्व दिलेले जानपद काव्यप्रकार यांनी हातीं घेतले; ग्रंथभाषा रूढ भाषेच्या वळणाची केली; गेयवृत्तें काव्यांत वापरलीं; गद्यांत बाणाच्या कादंबरीनें प्रवृत्त झालेली, अरण्याप्रमाणे अफाट शैली सोडून उपवनासारखी रम्य व सुटसुटीत शैली उपयोगांत आणली; राजाश्रयाची पर्वा न धरितां लोकाश्रयावरच भिस्त ठेविली; श्री शैलापासून वेंकटाचलपर्यंतच्या प्रांतांत यांनी एकच हलकल्लोळ उडवून दिला. कल्याण, लक्ष्मेश्वर, सोलापूर, बनवासी, पंपा, द्वारसमुद्र या प्रमुख शहरांतून अनुभवगोष्ठी व अनुभवमंटपें उभीं केलीं; व आध्यात्मिक जीवनाला महत्त्व दिलें. स्त्रियांनीहि संवादांतून भाग घेतले. तेहतीस स्त्रियांचीं 'वचन' पुस्तकें उपलब्ध आहेत. वीरशैवांनीं वर्णांचें महत्त्व कमी केलें; पशुयज्ञधर्मास पुनः धक्का दिला; वेश्या, महार, पतित, पापी या सर्वांना उन्नतीचा मार्ग दाखविला; 'कायका'ला महत्त्व दिलें; वृत्तिछेद केला नाही; धनिकांत व गरीबांत समदृष्टि उत्पन्न केली; गरीबांना स्वाभिमानी केले; श्रीमंतांना विनीत केलें; वर्गकलह पेटविला नाही; एकंदरीत जणू कांही आत्म्याची दिव्यज्योति अंतरिक्षांत पेटली असें कर्नाटकांत त्या काळीं झाले. अल्लम प्रभूचे संवाद आजहि मुमुक्षुज्ञान्यांची तृप्ती करितात. बसवेश्वरांचीं वचनें भक्तीचा झरा वाहवितात. अभंगवाङ्मय जसें कोटीनी मोजलें जातें तसेंच हें वचनवाङ्मय कोटीनें मोजलें जातें. या काळच्या काव्यलेखकांत पंपापुराचा हरिहर व त्याचा भाचा राघवांक या दोघांनी बरीच महत्त्वाची कामगिरी केली. चंपूकाव्याची परंपरा मोडून जानपदवर्णक काव्याला पूर्वकाव्यलक्षणांचे संस्कार देऊन गेय षट्पदी काव्यांचा प्रघात यांनी सुरू केला. या काळीं कुंतळ म्हणजे कर्नाटक आणि कर्नाटक म्हणजे कुंतळ देश अशी स्थिति होती हें बिल्हणाचा विक्रमांकदेवचरित व चालुक्य सोमेश्वर याचा मानसोल्लास अथवा अभिलषितार्थ चिंतामणी या ग्रंथावरून कळतें. या मानसोल्लासांत कुंतळकर्नाटकाच्या स्त्रियांचें मुख्य लक्षण केस कुरळे करणें हें असून महाराष्ट्रांतील स्त्रिया लंबलोलक धारण करीत असें सांगितलें आहे. याच मानसोल्लासांत मराठी व कानडी गीतें दिलीं आहेत. परंतु मराठी उदाहरणांहून कानडी उदाहरणांतील भाषा ज्यास्ती संस्कारसंपन्न दिसते. चक्रधराच्या महानुभाव सांप्रदायामुळे भागवतपंथी ब्राह्मणांत कट्टर

*विज्ञानेश्वरांस महाराष्ट्रांत शिवकालीं व तत्पूर्वकालीं अति मान देत, असें तत्कालीन कागदपत्रांवरून दिसतें. संपादक.

मराठीपणा बाणूं लागला होता. चक्रधर स्वतः गुर्जर ब्राह्मण असून त्याने मराठीचा पुरस्कार केला. याचें कारण म्हणजे, कर्नाटकांत जैनांचें प्राबल्य कमी होऊं लागलें त्याप्रमाणेच तें गुर्जर देशांत हेमचंद्रादि पंडितांच्या आश्रयांत वाढूं लागले; आणि गुर्जर भाषाहि त्यावेळीं बाल्यावस्थेंत होती. चक्रधरांना हेवा वाटे तो कानडी आणि तेलगूचा. महानुभावपंथांत महापंडित होते, तरी वाङ्मयाकरिता गुरुभक्तीमुळे सांप्रदायप्रीतीने मराठीची कास धरली. याच काळीं मत्स्येंद्रनाथशिष्य गोरखनाथाने आपला सांप्रदाय वाढवण्याकरिता महाराष्ट्राचा व मराठी भाषेचा आश्रय घेतला, याचें कारण पुढे दिल्याप्रमाणे असावेसें दिसतें. अल्लमप्रभूचें नांव नाथसांप्रदायी हटयोगप्रदीपिकेंत त्यांचें परंपरेंत येतें. रेवणसिद्ध अथवा मरुळसिद्ध हे वीरशैव लिंगायत धर्मप्रवर्तक महापुरुष नवनाथांत गणले गेले आहेत. अल्लमप्रभू आपल्या गुरूचें नांव अनुमिष देव असें सांगतो. हा मत्स्येंद्रनाथच असावा असा तर्क वाहतो. याचें कारण असें. अनिमिष म्हणजे मत्स्य. अल्लम मत्स्येंद्राच्या पंथांतला होता. येवढेच नव्हे तर तो गोरखनाथाचा समकालीन होता. गोरखनाथ व अल्लमाचे वादसंवाद झाले; त्यांत गोरखनाथ हरला. गोरखनाथाने लिंगमहानुभावांत कांही दिवस काढले; कानडींत वीरशैवाप्रमाणे वचनें लिहिलीं. त्याचीं वचनें उपलब्ध आहेत. गोरखनाथाचें मराठींत जें वाङ्मय मिळतें त्यांत आत्म्यास ' लिंग ' ही संज्ञा वरचेवर योजिली आहे. गोरखनाथ मत्स्येंद्राचा साक्षात् शिष्य होता.

अल्लमास अनुमिषाचा साक्षात् उपदेश असा झाला नाही. देह ठेवण्याचे ऐनवेळेस अनुमिषाची व अल्लमाची गांठ पडली अनुमिषाने अल्लमास लिंग दिला. हीच दीक्षा. 'गुरोस्तुमौनं व्याख्यानं शिष्यास्तुच्छिन्नसंशयाः'; जवळ जवळ येवढाच उपदेश. अनुमिषाने तात्काळ देह ठेविला. पुढे अल्लमप्रभु सर्व कर्नाटकभर हिंडला. मूळ बनवासी प्रांताकडील कानडीच माणूस तो असल्यामुळे कट्टर कानडी वीरशैवमतोद्धारक बसवेश्वरादि शरण मंडळींबरोबर कळचूर्यांची राजधानी जी कल्याण तींत शून्यसिंहासन स्थापलें, शिवानुभवमंडपाची स्थापना केली; व अध्यात्मजीवनास ऊत आणला. गोरखनाथाचा पराभव अल्लमाने केला असेल नसेल, परंतु गोरखनाथ मात्र अल्लमांच्या प्रभावशाली चरित्रावरून बोध शिकला. कर्नाटकास लागून असलेल्या महाराष्ट्रांत मराठीची कास त्याने धरली, कट्टरशैवास विरोधी पण हरि व हर समान असें मानूनहि विष्णूस जास्त मानणाऱ्या भागवत मताचा साहजिक पाठिंबा घेतला व गुरुसांप्रदाय चालू ठेविला. वीरशैव हटराजयोगादिकांना कमी मानीत, व त्यामुळे आलेला अनुभव सूक्ष्म अथवा कारणिक मानीत. अध्यात्मविचारधीर अल्लमप्रभूमुळे महानुभाव चक्रधराचा गुरु गुंडमप्रभूची आठवण होते. गुंडमप्रभूच्या शिष्याने प्रवर्तिलेल्या सांप्रदायास महानुभाव पंथ म्हणतात. महानुभावपंथहि वीरशैवाप्रमाणे संन्यासाचारप्रमुख होता. बायकांनाहि या पंथांत सामील होतां येत असे. महदंबेचें उदाहरण महानुभावांत आहे. वीरशैवांत नीलांबा, गंगांबा, महादेवियक्का, मुक्तायक्का, रेमव्वा, काळव्वा, अक्कनागाई,

रेकम्मा, सत्यक्का इत्यादि ३३ शरणिनींनी वचनवाङ्मयांत भर घातली. वीरशैवांत ('महानुभाव', म्हणजे 'Mystic Experience',) तूर्यांतीत महानुभावास अत्यंत महत्त्व आहे. महानुभाव नसलेल्या कोणत्याहि शरणास बसवेश्वर अल्लमप्रभु इत्यादिकांच्या महानुभाव गोष्ठींत स्थान नसे. सिद्धाचा प्रभाव, वैभव याअर्थी दिगंबर जैनांतहि 'महानुभाव' शब्द प्रचलित होता. असो. इस्लामधर्माच्या प्रभावाच्या काळीं महानुभावावर जो टपका आला तसे वीरशैवांचेंहि झालें. वैदिकांकडून विरोध झाला. परंतु महानुभाववाङ्मयाप्रमाणे वीरशैववाङ्मय गुप्तलुप्त वाङ्मय झालें नाहीं. महानुभावांस महाराष्ट्राबाहेर उत्तरेकडे वाट फोडावी लागली परंतु कर्नाटक वीरशैवांचा बालेकिल्ला बनला. रामानुजांच्या चळवळीमुळे भागवतधर्मास उत्तेजन मिळालें व रुद्रभट्ट याने होय्सळ यादवांच्या आश्रयांत 'जगन्नाथ विजय' हें महाकाव्य लिहिलें. यांत कृष्णलीला वर्णिलेल्या आहेत. मायाद्वैतास पुनः जबरदस्त विरोध झाला. या सर्वांचा असा परिणाम झाला कीं, उदयोन्मुख महाराष्ट्रांत मराठी भाषेस प्रचोदन मिळालें. वीरशैवांच्या चळवळीमुळे जैनधर्माशीं मरणांतिक झटपट सुरू झाली व शांकरमताला कर्नाटकांत मान्यता मिळेना. होय्सळ नरसिंहाचा मुलगा दुसरा बल्लाळ याने चालुक्य कळचूर्यांच्या राज्यांतील पुण्यापर्यंतचा प्रांत काबीज केला. पुणें हें बल्लाळाचा मुलगा जैत्रपाळ या वैसरायाचें[1] मुख्य ठिकाण झालें. हा वेदांती होता. अनुभवाची भूक याला लागली व मुकुंदरायाच्या विवेकसिंधूमुळे त्याची भूक हरली.

होय्सळ यादवांच्या पदरीं मराठे लोक गजशिक्षक म्हणून रहात असत असें दिसतें. 'जा, ऊठ, तूं बैस, ये' इत्यादि शब्द ते वापरीत असत असें होय्सळ यादवकालीन एका कानडी कवितेंत सांगितलें आहे. जैत्रपाळास थोडेंबहुत मराठी पूर्वीपासून येत असेल. त्याला शांकराद्वैत आवडत असेल. परंतु पूर्वप्रतिष्ठित जैनधर्म, राजप्रतिष्ठित रामानुज वैष्णवधर्म व उदितोदित वीरशैवधर्म यांच्या दंगलींत जैत्रपाळास मिळावा तो अवसर मिळाला नाहीं. नाथसांप्रदायी अद्वैती मुकुंदरायाने तें कार्य केलें. मराठी वाङ्मय मुकुंदरायाहून जुनें असावें. परंतु फार जुनें असावें असें वाटत नाही व असण्याचें कारण नाहीं. याचें पहिलें कारण असें:– मुक्तेश्वराच्या पूर्वीचे जे मराठी शिलालेख मिळतात ते फार प्राथमिक अवस्थेंतले दिसतात. कानडी व संस्कृत शिलालेख अथवा ताम्रपटांतील भाषेचा भारदस्तपणा कित्येक वेळा काव्याच्या तोडीचा असतो किंबहुना त्यांत खंडकाव्यें मिळतात तसें मराठीचें नाहीं. दुसरें कारण मराठी भाषेला राजाश्रय तरी बिलकूल नव्हता, ती राजांची भाषा नव्हती व असती तर मराठी भाषेंत फार पूर्वीं काव्यरचना व्हावयास पाहिजे होती. हल्लीं तसें म्हणण्यास ऐतिहासिक पुरावा कांही मिळत नाही. कानडी, तेलगु व तामिळ या देशी भाषांविषयीं तसा मिळतो, आणि मुबलक मिळतो. मुकुंदराजपूर्वकालीन शिलालेख व वाङ्मय पार बुडून जावें असें महाराष्ट्रावरच काय संकट ओढवलें होतें हें इतिहास सांगत नाहीं. तिसरें कारण असें कीं, मुकुंदराज, ज्ञानेश्वर अथवा

१ वैसराय = Viceroy. – संपादक.

महानुभाव *साहिती यांनी मराठी वाङ्मयाची पूर्वपरंपरा सांगितली नाही. इतकेंच नव्हे तर उलट आपणच त्या भाषेस नावारूपांस आणिली असा त्यांचा अभिप्राय व आवेश सांगतो व ते खरेंहि आहे. कर्मठ वैदिक ब्राह्मणांनी आधी मराठीस अस्पृश्य मानलें, व समाजांत वावरूं लागल्यावर तिला वाळींत टाकण्याचा प्रयत्न केला हें ज्ञानदेव, एकनाथ वं तुकाराम या सर्व संतांच्या चरित्रांवरून स्पष्ट दिसतें. लेखकवर्गाने मराठीस लवकर हातीं धरलें नाही. कर्मठ वैदिकांना नरम होण्यास विलंब लागला.

आता मराठीस प्राचीन ठरविण्याच्या एका अनुमानाचा विचार करूं. मुकुंदराजसारखें काव्य उत्पन्न होण्यास अथवा ज्ञानेश्वरासारखें काव्य उत्पन्न होण्यास २००–३०० वर्षांपूर्वीपासून वाङ्मय निर्माण झालें असलें पाहिजे अशी ही तर्कसरणी आहे. कानडी वाङ्मय प्राचीनतर-तम करण्यास एखाद्या वेळीं या तर्काचा अवलंब केला जातो. परंतु हा तर्क फोल आहे. इंग्रजी शिक्षयाचे वाङ्मय मराठीत शंभर वर्षाच्या आंतच निर्माण झालें नाही काय ? भाषाभिमानी लोक, भाषाभिमानी कवी व साहित्यप्रपूर्ण अशी निकटवर्तिनी भाषा असल्यास उत्तम काव्य निर्माण होण्यास शतकें लागत नाहीत. खिस्त कवी स्टीफनास कोंकणींत काव्य लिहिण्यास मराठीचा आसरा पुरे होता. कर्नाटकांत तुळु अथवा कोडगु भाषेंत तसें प्रयत्न होऊं पहात आहेत. महाकवींचा निश्चय हा मायभाषेचा ललाटलेख होय. हा लेख मराठींत लिहिण्याचें श्रेय सध्यातरी नाथ व महानुभाव सांप्रदायी ब्राह्मणांकडे येतें. त्यापूर्वी खेवण्यांनी म्हणजे दिगंबर जैन ब्राह्मणांनी प्रयत्न केला असावा परंतु तसें समजण्यास पुरेसा पुरावा नाही. ' ओनामासीधं ' व ' चाउंडराये करवियले ' हे वाङ्मयावशेष त्यांच्या कार्याचे अवशेष दिसतात. एकूण काय चालुक्य-कळचूर्य राजाच्या वाटणीकरिता सेऊण यादव व होय्सळ यादव यांच्यात यादवी माजली. देवगिरीकर पूर्वी कानडीचेच भोक्ते होते. त्यांच्या कानडी शिलालेखाची भाषा व विचारगौरव यांपुढें उपलब्ध मराठी शिलालेख फार हिणकस वाटतात. परंतु राजकारणाकरिता बहामिनी राज्याप्रमाणे प्रतिष्ठित कानडीविरुद्ध उदयोन्मुख मराठीस त्यानी हातीं धरले. दुर्लक्षित शांकराद्वैतमताने महाराष्ट्रांत ओसरी पाहिली. पराभूत नाथपंथाने मराठींत ठाणें बसविलें. महानुभाव कट्टर मराठीने कर्मठ वैदिकांवर मात करून शैव महानुभावांस आपल्या भागवत व वैष्णव महानुभावाने थोपवून धरलें. कर्नाटकांतल्या धार्मिक, राजकीय, सामाजिक परिस्थितीने मराठी भाषेचा वाङ्मयीन जन्मकाळ जवळ आणिला. दुर्विनीत, नृपतुंग, कन्नर, अरिकेसरी, तैलप, विक्रमादित्य, हरिहर, देवराय, कृष्णराज, चिक्कदेवराव, विष्णुवर्धन, या कानडी साहित्याच्या आश्रयदात्यांच्या मालिकेंत बसणाऱ्या दुसऱ्या होय्सळ बल्लाळाच्या कुमारानेच मराठीची ध्वजा धरिली असें दिसतें. पुढच्या शंभर वर्षांत कर्नाटकांतील अग्रहारांत, मराठी भाषेचेंहि शिक्षण विद्यालयांत दिलें जात असें असा कानडी शिलालेखांचा व साहित्याचा पुरावा मिळतो. याचें मुख्य कारण म्हणजे

* साहिती = साहित्यिक – संपादक.

देवगिरीकरांच्या दरबारीं मराठीचा मान वाढूं लागला हें होय.

आता कानडी वाङ्मयाच्या तिसऱ्या युगाचा इतिहास थोडक्यांत देतों. या युगाचा खरा शेवट विजयनगराच्या राजवटीच्या प्रारंभीं होतो. परंतु येथे तो ज्ञानेश्वरीच्या काळाशीं म्हणजे १२९० त थांबविला आहे, याचें एक कारण पूर्वीच सांगितलें आहे. दुसरें कारण ओघाने पुढे येईल. वीरशैवांच्या व वीरवैष्णवांच्या चळवळीने जैन पार दबून गेले नाहीत, आणि हजार वर्षें प्रतिष्ठा पावलेल्या जैन धर्माचीं पाळेंमुळें वटवृक्षाप्रमाणे अपार होतीं. होय्सळांनी वैष्णव धर्म स्वीकारूनहि जैन धर्म सोडला नाही. संवदत्तीच्या रट्टांनी व कारवार, धारवाड, विजापूर व बेळगांव प्रांतांतील जैनवैश्य धनिकांनी व क्षत्रिय पाळेगारांनी कानडी-जैन-वाङ्मयास जोराचा पाठिंबा दिला. लक्ष्मेश्वराच्या आचण्णकवीने वर्धमान पुराण लिहिलें. वनवासी प्रांताच्या कविकामाने 'श्रृंगार—रत्नाकर' हा रसविषयक ग्रंथ लिहिला व रसोत्पत्तीविषयी नवीन मत प्रतिपादिलें. बंधुवर्म्याचे हरिवंशाभ्युदय व जीवसंबोधन; देवकवीची कुसुमावळी कादंबरी, पार्श्वपंडिताचें पार्श्वनाथ पुराण, अग्गळाचें चंद्रप्रभपुराण, कमलभवाचे शांतीश्वर पुराण, महाबलकवीचें नेमिनाथ पुराण, माघनंदीचा श्रावकाचार हा गद्य ग्रंथ, गुणवर्म्याचा पुष्पदंत पुराण, बालचंद्राचा उद्योगसार हीं पूर्वपरंपरेचीं काव्यें तर झालींच; परंतु वीरशैवांनी प्रारंभिलेल्या षट्पदी मार्गाचाहि अवलंब करून शिशुमायणांनी अंजनाचरित्र व त्रिपुरदहन आणि कुमुदेंदु यांनी रामायण हीं गेय काव्यें लिहिलीं. मन्मथविजय अथवा कब्बिगरकाव या काव्यांत, होय्सळ बल्लाळ व हानगल्लचा कादंब काम याचें युद्ध कामदहनाच्या व ईश्वराच्या अर्धनारीश्वरकरणाच्या मिषाने वर्णित झालें आहे. या काव्यांत कर्त्याने संस्कृत शब्दांना कानडीचा शिक्का मारल्यावरच दाखल करून घेतलें आहे. या काव्यांत एकहि शुद्ध संस्कृतरूपाचा शब्द मिळत नाही. दुसऱ्या बल्लाळाचा मुलगा नरसिंह याच्या दरबारीं जन्न अथवा जनार्दन हा कविचक्रवर्ति गणला गेला होता. याने अनंतनाथ पुराणांत होय्सळ व सेऊण यांच्या युद्धाच्या वर्णनाचा भाग आणला आहे. याचें यशोधर काव्य वादिराजाच्या संस्कृत काव्याहून सरस वठलें आहे. प्रेमाचे विलास व दुर्विलास वर्णण्यांत याचा हातखंडा आहे. याने लिहिलेले शिलालेख काव्येंच आहेत हें सांगणें नकोच. परंतु या जन्नाच्या घराण्याची महत्त्वाची गोष्ट म्हणजे हे सर्वच साहित्यभक्त होते. जन्नाचा पिता सुमनोबाण हा मोठा कवी होता. जन्नाचा गुरू नागवर्म याने काव्यावलोकन भाषाभूषण, वस्तुकोश, छंदःशास्त्र, याप्रमाणें साहित्यशास्त्राच्या प्रत्येक शाखेगणिक एक एक प्रमाणभूत ग्रंथ लिहिला. आजहि त्या ग्रंथांचें स्थान अढळ आहे. जन्नाच्या बहिणीचा नवरा मल्लिकाअर्जुन याने कानडी सुभाषितांचा संग्रह करून काव्यधर्माची मीमांसा केली. जन्नाच्या बहिणीचा मुलगा केशिराच प्रख्यात कानडी व्याकरणकार झाला. असें या घराण्याने साहित्यमंडळच स्थापिलें व कानडीची ध्वजा उचलून धरली.

वीरशैव लिंगायतांनी वाङ्मयनिर्मिती चालू ठेविली होती. कांही गाणीं, कांही वचनें व पाल्कुरिके सोमनाथ या आंध्रकर्नाटक कवीचे सहा कानडी ग्रंथ व सोमराजाचे 'उद्भट

काव्य ' ही एवढीच वाङ्मयास भर त्यांनी घातली. त्यांचें मुख्य लक्ष्य वीरशैव समाजाच्या संघटणेकडे होतें. कानडीच्या याच युगांत मध्वाचार्य झाले. द्वैतमताचे पुरस्कर्ते म्हणून आचार्यत्रयांत त्यांची गणना आहे. यांचेच शिष्य नरहरितीर्थ यांनी दासपरंपरा चालू केली यांचें उपास्य राम हें खरेंच. परंतु पांडुरंगपुरीच्या विठ्ठलाची कीर्तनें यांनी लिहिलीं. ' नामदेव व ज्ञानेश्वरापूर्वीच कर्नाटकांतील कानड्या विठ्ठलाची भक्तपरंपरा चालू होती. आणि नरहरि तीर्थ त्याचे पुरस्कर्ते होते. यांच्या दासमार्गांत श्रीपादराय, व्यासराय, पुरंदरदास, वादिराज हे प्रख्यात दास तुकारामापूर्वी होऊन गेले. पोलाळ्व दंडनाथ या होय्सळांच्या सेनापतीनें १२२४ च्या सुमारास हरिहर क्षेत्राचें महत्त्व वाढविण्याचा प्रयत्न केला, देवस्थान वाढविलें, व हरिहरचारित्र्यकाव्य लिहिलें. देवगिरीकर यादवांनीहि हरिहरास प्रतिष्ठा देण्याचे प्रयत्न केले. परंतु पंढरपुराविषयी त्यांचा हेतू जसा सफल झाला तसा हरिहरास झाला नाही. धारवाड, विजापूर, बेळगांव प्रांतांतील भक्तिमार्गीय अद्वैत्यांचें लक्ष पंढरपूरच्या विठोबाने हेमाडपंताच्या पुढाकाराने वेधलें. माध्ववैष्णवाना तरी तें स्थान पूज्य होतेंच. विद्यारण्य ज्या ब्राह्मणांत मोडत तशा कन्नड ब्राह्मणकुलातील चौंडरसानें आपल्या अभिनवदशकुमारचरित्र या काव्यांत पंढरपूर क्षेत्रवर्णनाचा प्रसंग जुळवून आणला आहे. त्यांतील वर्णनाच्या रीतीवरून पाहतां तें वर्णन ज्ञानेश्वरपूर्वकालीन असावें असें दिसतें. ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंत सर्व संत विठ्ठलाच्या शिरावर शंकरलिंग आहे असें मानितात. परंतु चौंडरस त्याच्या डोक्यावर केवळ मुकुट आहे असें म्हणतो. यावरून या कथेंत दोन स्थित्यंतरें होऊन गेलीं असावीं असें दिसतें. विष्णूहून शिव जास्त मोठा हे ठरविण्यास त्या किरीटास लिंगत्व दिलें व विष्णूच्या डोक्यावर बसविलें. ' शिवं धर्मोपदेष्टारं विष्णु धर्मोपदेशकं ' अशी स्तुति करणाऱ्या शांकराद्वैत परंपरेतील कोणाची ही कल्पना असेल अथवा देव व जंगम डोईवर लिंगधारणा करतात या समयाप्रमाणे पांडुरंगपुरचा विठ्ठल शैवहि असेल. परंतु मध्वाचार्यांच्याकाळीं पारडें फिरलें व या कथेचा उलट अर्थ सांगण्यांत आला असावा. माध्व विष्णु सर्वोत्तम आहे, रुद्राचें स्थान जीवोत्तम प्राणाबरोबरचें आहे असें मानतात. यामुळे महाराष्ट्रीय विठ्ठलभक्तांत 'विठोने शिरीं वाहिला देवराणा,' 'माझ्या भजनी आस्था तरी तयाते मी माथा मुकुट करी ' इत्यादि उक्तींचा प्रसार झाला असावा-कांही असो; विठ्ठलभक्ती ही कर्नाटकांत महाराष्ट्राहून पूर्वीची होती. अर्थात् ती कर्नाटकाचीच होती. याची जाणीव त्या काळच्या संतानांहि होती. चौंडरस विठ्ठलास अभंग विठ्ठल म्हणतो. यामुळेच विठ्ठलविषयक ओवीप्रबंधास अभंग हें नांव आलें असावें की काय हें मननीय आहे. ओवीचा संबंध मात्र कानडी त्रिपदीशीं निकट दिसतो. बायकांच्या कांडण्यारांधण्याचा गीतांत या छंदाचा उपयोग फार प्राचीन काळापासून केला जातो. बरीचशी कानडी जानपदगीतें या छंदांत आहेत. सहाव्या शतकांतील मंगलीशाच्या शिलालेखांत या छंदांचा उपयोग वाङ्मयांत दिसतो. आठव्या शतकांतील गंग शिवमाराने एक गजशास्त्र लिहिलें. त्यांतील गजाष्टक या त्रिपदी छंदांत होतें. चंपू

वाङ्मयांत त्रिपदीचा उपयोग रांधण्याकुटण्याच्या प्रसंगीं कांहीं वेळां केला आहे. ज्ञानेश्वर अथवा तुकारामाच्या कांहीं उद्गारावरून ओवीवृत्ताची परंपरा हीच होती असें दिसतें. हें त्रिपदीवृत्त अंगाई गीतांतहि उपयोगिलें जातें. आणि अंगाई-गीताच्या शेवटीं ओई अथवा होई अशी म्हणण्याची प्रथा आहे. त्रिपदी हें नांव संस्कृत लाक्षणिकाने दिलें. देवगिरीकर सिंघणाच्या आस्थानांतील शार्ङ्गधर. याने हें त्रिपदीवृत्त कर्नाटकी असल्याबद्दल सांगून हें कसें गावें याचा नियम सांगितला आहे.

महाराष्ट्रांत ज्ञानेश्वराप्रमाणे ओवीचा बांधेसूदपणा दुसऱ्या कोणांतही नाहीं हें मद्शूर आहे. परंतु आज त्या पूर्वीची महानुभावांची ओवी मिळते. ओवीचे सोळा प्रकारहि त्यांनी निर्देशिले आहेत असे कळतें. हें वृत्त बऱ्याच द्राविडी छंदांप्रमाणे **तालप्रधान, मात्रानियत** व **अक्षरक्लृप्त** दिसतें. याचा विचार स्वतंत्रच करण्याचा असल्यामुळें येथे ओवीचे व होई त्रिपदीचे छंदःसादृश्य तेवढें दाखवितों.

झोपाळ्यावरील ही नमनाची ओवी घेऊं.

पहिली माझी ओवी। पहिला माझा नेम।
तुळशीखाली राम। पोथी वाची ॥

पहिल्या तीन चरणांत तीन ठेके आहेत. चौथ्यांत दोन आहेत.

आतां, ज्ञानेश्वरींतील पहिलीच ओवी घेऊं.

ॐ नमो जी आद्या। वेदप्रतिपाद्या।
जय जय स्वसंवेद्या। आत्मरूपा. ॥

याबरोबरच कानडींतील एक अंगाईगीतांतील ओवी घेतों.

बारो बारो नन्न। बाल चक्रवर्ती
नालीगि म्याले सरसोति। इरुवंथ
ननबाल वाल हाल कुडिबारो.

या ओवींत तिसऱ्या चरणानंतर व चौथ्याच्या प्रारंभीं असे दोन ठेके ज्यास्त आहेत. याचे प्रकारहि बरेच आहेत. सहाव्या शतकांतील त्रिपदी ओवी अशीच आहे.

साधूगे साधू मा। धुर्यंगे माधुर्य
बाधिप्पकलिगे कलियुग। विपरीतन्
माधवनीतन्। पेरनल्ल ॥

याच ठिकाणीं महानुभावी महदंबेच्या धवळ्याबद्दल दोन गोष्टी सांगतों. 'धवळ' म्हणजे कीर्तिगीत—यशोगान-असा अर्थ जैनवाङ्मयांत दिसून येतो. माझ्या मतें महदंबेचे धवळे द्राविड 'अक्कर' जातीच्या छंदांत आहेत. हा छंदःप्रकार तेलगू वाङ्मयांतहि आहे. धवळ्यांतील एक गीत मी घेतों.

श्रीकृष्ण रुकुमीणि गरजथ वुरे यादव दाटुगा ये।
श्रीचक्रधराचे शीरि धरौनिया श्रीचरणु धवळे गाईजताये ॥

गोविंदराणा जेणे रुकुमीणि हरियेलि पवाडे केले अती ।
बहुता पाठविले परमागति भक्ति आईवता श्रीकृष्णचरिती.

याची तुलना पंपकवीच्या काळच्या म्हणजे ९४० तील वृत्ताशीं करून पहावी.

मृगमं गाळिय निर्केयं पक्केयं गणिदमं कंडियं मार्कंडियं ।
पुगिलं पोगं बारियं सन्नेयं नूरुवमर्चुव निल्वेडेयं ॥
वगेयं तेगे यनछाटमं काटमं नोन्तुदं सावुदनेछंदर्दि ।
वगेदागळरसरोळेल्ल केळ्नीम्वल्ले वेंटेकाररोळेल्लमाने वल्लेम् ॥

गुंडमप्रभू, चक्रधर, नागदेव, महदंबा या लोकांना कानडी व तेलगू भाषा येत असण्याचा संभव आहे. कांही असो. मराठी वाङ्मयाच्या शास्त्रीय व ऐतिहासिक अभ्यासाला कानडी वाङ्मयाच्या भाषेचें व इतिहासाचें ज्ञान अवश्य आहे. होय्सळ नारसिंहाने देवगिरीच्या सेउणांचे सेनापति विक्रमपाल व पाउस यांचा पराभव करून युद्धांत त्यांना मारून त्यांचीं मुंडकीं आपल्या हत्तीच्या ध्वजास टांगून राजधानीस परत येत असतां त्यांचीं हलणारीं डोकीं भाटाप्रमाणे बल्लाळाची स्तुतीच करीत होतीं की काय असें भयानक हास्याचें वर्णन १२२४ च्या दावणगेरी शिलालेखांत येतें. विक्रमपाल व पाऊस हे मराठे सरदार असल्यामुळे त्यांच्या तोंडीं मराठीची नकल केलेली भाषा पुढील श्लोकांत वापरली आहे.

जवरातु जगदेकवीरु मल्लदेवारोहकू बापु जा ।
धन नारायणु नारसिंगु भल एंदंर्णिमगे ताम्मेच्चि तु ॥
गुवर्वोल् विक्रमपालपावुस शिरःकंजम् गळल्लाडुतिर् ।
दुवु तन्नानेय दोन्नडेंचेयद चंचत् केतुदंडगं गळोळ् ॥

होय्सळांचा विजय फार दिवस टिकला नाही. नारसिंहाचा सावत्रभाऊ रामनाथ याजबरोबर दक्षिणेंत वरचेवर युद्धें होऊं लागलीं व त्याकरिता तुंगेपलीकडील राज्याची आशा होय्सळांनी सोडली. बिज्जणादि सरदारांच्या साहाय्याने, विठ्ठलाच्या भक्तिबळाने व हेमाद्रि बोपदेवाच्या धार्मिक चळवळीने धारवाड, बेळगांव, विजापूरकडील मंडळी देवगिरीकरांकडे वळली. साळुव तिक्कम राणे बनला. बाराव्या शतकांतील अभिधानचिंतामणी या वैद्यकग्रंथास जोडून कानडी-मराठी पर्याय शब्द देणें नरहरि पंडितास अवश्य वाटलें. इ. स. १२९० या ज्ञानेश्वरीच्या जननसंवत्सरांत जवनिका नारायण, राऊतराय विरुदांकित पेरुमाळ या सेनापतीने म्हैसूरांतील माल्गिी विद्यालयांत कानडी तामीळ भाषेबरोबर नागरी व आर्य म्हणजे जैनमहाराष्ट्रीजन्य गुजराथी व मराठी या भाषांचेंहि अध्ययन कानडी विद्यावंतास अवश्य केलें. ह्या राजकारणाचा शेवट काय झाला असता, मलिक काफर आला नसता तर देवगिरीकरांचे व त्याबरोबर मराठी भाषेचें भाग्य कसें उजळलें असतें या गोष्टीच्या कल्पना करण्यांत अर्थ नाही. पुढे मुसलमानांनी मराठी, फारसी, उर्दू भाषांस आणि विजयनगरकरांनी

कानडी व संस्कृतभाषेस का व कसा आश्रय दिला हा प्रस्तुतचा विषय नव्हे. येथ-पर्यंत मी माझा विषय मांडला. आता उपसंहारादाखल दोन शब्द लिहून आटपूं.

## उपसंहार

कर्नाटकांतील वाङ्मयसेवक त्यावर पोट भरत नसत. पंप, जन्न, नागवर्म, दुर्गसिंह, पोल्ळव, बसवेश्वर हे दंडनायक होते. हरिहर, अल्लम, नागवर्माचार्य हे विरक्त होते. आज आपणांसमोर वर्णिलेल्या कालखंडांत ३०० ग्रंथकार झाले व ६००–७०० ग्रंथ होऊन गेले. साधारणपणें १०० जैन, १०० लिंगायत, ५० ब्राह्मण व ५० इतर जातींच्या लोकांनी ग्रंथ लिहिले. ३०–३५ कवियित्री होऊन गेल्या. यांशिवाय कानडी लोकांनी संस्कृत-प्राकृतांत केलेली सेवा वेगळी आहेच. कानडी वाङ्मयाचें फार त्रोटक वर्णन मी दिलें. येथे नांवनिशीहून ज्यास्त कांहीं देणें शक्य नव्हतें. महाराष्ट्रीयांचें लक्ष वेधण्याकरिता तुलनात्मक विवेचनहि केलें. महाराष्ट्रीयांची इतिहासप्रियता जाणून इतिहासदृष्टीनें त्याची मांडणी येथवर यथामति केली. कर्नाटकस्थ लोकांत जगांतील कोणत्याहि लोकांइतकीच बुद्धि आहे; ते पराक्रमांत कमी नाहीत; त्याग त्यांच्या अंगीं आहे या सर्वांची साक्ष त्यांचें हें पूर्वीचें वाङ्मय भरपूर देईल.

---

# रद्दींतील रत्नें

रत्न १३ शोधक—संपादक

## परहंस मंडळी.

ज्ञानोदय, १–१०–१८५१.

मुंबईमध्यें परमहस मंडळी म्हणून स्थापित झाली आहे अशी लोकांत बातमी आहे आणि याविषयीं छापण्याकरितां कांहीं पत्रें आम्हास आली आहेत. परंतु त्या गोष्टीविषयीं बहुधा कोणास बरोबर ठाऊक नाहीं. थोड्या दिवसानी उघड होईल तेव्हां छापणें तें छापूं. अद्यापि कांहीं विशेष घडला नाहीं. परंतु प्राचीन हिंदु व हल्लींचे तरुण हिंदु यांमध्यें बहुत फेर पडला आहे. कांहींएकांस शास्त्रपुराणांतील गोष्टी खोट्या तुच्छ दिसतात, तरी आपणांला ते हिंदु म्हणवितात. कांहींएक नास्तिकसारखे आहेत. कांहींएक साहेब लोकांच्या समजुतीप्रमाणें समजतात; कांहींएक साहेबांचीं निंदा करतात; कांहींएक एतद्देशीयांची निंदा करतात; कांहींएक ज्ञानावर येतात, कांहींएक भ्रमिष्ट होऊन सर्व गोष्टींविषयीं संशय धरतात; कांहींएक आम्हीच ज्ञानी, आम्ही सर्व समजतों, आमच्या सारिखे कोणी नाहींत असें जाणतात तर याप्रमाणें पुष्कळांचे पुष्कळ विचार होऊन लोकांत अशी गडबड चालली आहे; आणि कोण कोण काय काय उपाय करितात ते पाहावें. परंतु आम्हांस वाटतें कीं या वादविवादानें व या सर्व वेगवेगळ्या उपायानी शेवटास प्रकाश होऊन सुधारणुकीचें काम जाईल.



---

अहमदनगरचा अप्रसिद्ध पण अद्वितीय

# कोशकार

## ( हिंदुस्थानी मराठी कोश )

साहित्यसंमेलनप्रसंगीं बडोद्यास जाणें झालें असतांना तेथील ओरिएंटल इन्स्टिटयूट-मध्ये, इन्स्टिटयूटचे प्रमुख डॉ. भट्टाचार्य यांच्या कृपेने आम्हांस एक हस्तलिखित कोश पाहण्यास मिळाला. सदरहू कोश सुमारें ५५ वर्षांपूर्वी रचण्यामध्ये आलेला आहे. विशेष कौतुकाची गोष्ट अशीः— सदरहू कोश केवळ एका गृहस्थाने आपल्या दृढनिष्ठेने व परिश्रमाने सिद्धीस नेलेला आहे. अलीकडील काळांत कै. रा. अनंतराव काळेले किंवा कै. वासुदेवरावजी आपटे यांनी एकएकट्यांनी एक एक कोश हातीं घेऊन संपूर्ण केल्याचीं उदाहरणें आपणांस माहीत आहेत. त्यांच्या उदाहरणांवरून त्यांस आपलें काम पुरें करण्यास किती श्रम पडले असतील याची चांगली कल्पना होते.

हल्ली शब्दकोशमंडळातर्फे मराठी विस्तृत कोश प्रसिद्ध होत आहे. त्याच्या पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत अनेक प्रसिद्ध व अप्रसिद्ध कोशांचा उल्लेख आला आहे. त्यांत आम्ही ज्याचा आज येथे अल्पसा परिचय करून देण्याचा योजिलें आहे तो कोश आलेला नाही. तथापि एकवार हा कोश विद्वानांस परिचित असणें आम्हास अवश्यक वाटल्यावरून आम्ही पुढील माहिती देत आहों.

हा कोश इ. स. १८७८ त पुरा झाला असें दिसतें. याचा कर्ता रूपसिंह सुंदरसिंह नांवाचा नगरच्या कलेक्टर कचेरींतील एक व्यासंगी कारकून हा होता. व्यासंगाने असहाय स्थितींतहि माणसास किती मोठें कार्य करितां येतें याचें हा कोश हें एक उत्तम उदाहरण आहे. इंग्रजी भाषेचा कोश एकटयाच्या बळावर रचणारा डॉ. जॉन्सन् हा एक होऊन गेला. डॉ. जॉन्सन्च्या चरित्राचें रहस्य महाराष्ट्र समाजास समजाऊन सांगणारे निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर हे व त्यांची निबंधमाला हीं दोन्हीं हा कोश पुरा झाला त्या वेळीं गाजत होती. परंतु या कोशाच्या प्रसिद्धीचा भाग्योदय त्या वेळीं आला नाही. आणि आताहि यापुढे येईल असें वाटत नाही.

डॉ. भट्टाचार्य यांनी हा कोश गायकवाड सरकारासाठी २०० रुपये किंमतीस विकत घेतला. कांही सावकारी व्यवहारांत रद्दींत जावयाच्या ऐवजीं हें रद्दींतील रत्न प्राचीन ग्रंथालयांत जाऊन बसलें. डॉ. भट्टाचार्यांच्या सारखा रत्नपारखी गायकवाड सरकारांच्या पदरीं होता म्हणूनच ही गोष्ट घडून आली.

सदरहू कोश सुवाच्य अक्षरानें लिहिलेला असून मजबूत कातडी पुठयानें मढविलेला आहे. हा फारसी किंवा उर्दू मराठी कोश आहे व त्याची अकारविल्हेहि त्याच भाषेंतील क्रमा-

प्रमाणे आहे. मूळ शब्दाचा मराठी उच्चार देऊन व त्याची मूळजात सांगून मग त्याचें उर्दू लिपींत वर्णलेखन केलें आहे. शेवटीं त्याचा अर्थ दिला असून त्याचीं साधितेंहि दिलीं आहेत व त्यांचेहि अर्थ सांगितले आहेत. मधून मधून आधारादाखल मुसलमानी बयतहि दिलेले आहेत हें विशेष आहे. इतकी मेहनत ग्रंथकर्त्यानें हा कोश रचतांना घेतली आहे.

देशभाषेचा अभिमान व तिची सेवा करण्याची लालसा ही या कोशकर्त्याचे ठिकाणीं उत्कटत्वाने वसत असलेली दिसत आहे. ग्रंथकाराने आपलें हृद्गत आपल्या प्रस्तावनेंत मोकळे-पणाने सांगितलें आहे. स्वभाषेकडे दुर्लक्ष केल्यामुळे आपण मृतप्राय होऊन आपलें नांवहि उरणार नाही असें भय राजवाडे यांनी उच्चारून दाखविण्यापूर्वी ५० वर्षें या कोशकर्त्याने बोलून दाखविलें आहे.

देश सुधारण्यास विद्यावृद्धि हेंच कारण असें हा कोशकर्ता सांगतो. अशा विद्यावृद्धीस मोठमोठे पगारदार किती साहाय्य करितात तें आपणांसहि या कोशकाराप्रमाणे आज विचारितां येईल. एक एका शब्दाकरिता कोशकर्त्यानें प्रहराचे प्रहर मोडलेले आहेत. ग्रंथकर्त्यानें हा कोश आपले वडील सुंदरसिंह व बंधु लछमनसिंह यांच्या मदतीने लिहिला. दुर्दैवाने ते दोघेहि १८७८ सालीं महिन्याचे अंतराने वारले. या कोशाची तयारी १८७० सालीं सुरू होऊन १८७८ सालीं पुरा झाला; म्हणजे या कोशासाठी आठ वर्षें ग्रंथकार सतत प्रयत्न करीत होते असें दिसतें. मराठी ही ग्रंथकर्त्याची स्वभाषा नसतांना देखील त्याने तिची इतकी बहुमोल सेवा केली हें खरोखरच त्यास भूषणावह होय. आपल्या भाषेने संस्कृताची बरोबरी करावी आणि इंग्रजीपेक्षा तिने मागे राहूं नये अशी ग्रंथकर्त्याचे मनांत फारच तळमळ असावी असें दिसतें.

या कोशांत ४०।४५ हजार शब्दांचा संग्रह झालेला आहे असें डॉ. भट्टाचार्य यांचे म्हणणें आहे. कोश जरी छापला नाही, तरी त्याचा उपयोग नवीन कोशकारांस खचित पुष्कळ होईल.

रा. रूपसिंह यांची प्रस्तावना विचारांचे दृष्टीने फार लक्ष्यांत घेण्यासारखी वाटली म्हणू-नच आम्ही ती पत्रिकेंत छापली आहे. ग्रंथकर्त्याचीं पुढील विधानें विशेष मननीय आहेत असें आम्हास वाटतें:—

(१) जी देशभाषा नव्हे, तिचा त्या देशामध्ये कितीहि फैलाव झाला व कितीहि लोकांनी जन्मचे जन्म तिच्या अभ्यासामध्ये व प्रसारामध्ये घालविले, तथापि देशभाषेकडे त्यांनी लक्ष दिल्यावांचून व्यर्थ आहे.

(२) ज्यांना खरोखरी इंग्रजीचें चांगलें ज्ञान झालें आहे त्यांतील बहुतेकांना स्वभाषेच्या अज्ञानामुळे त्या शिकण्याचा कांहीच स्तुत्य उपयोग करतां येत नाही.

(३)...लहानथोर कामगार सुमारें तीनहजार असतील पण त्यांच्या मोठ्या पगाराच्या मानाने किंवा देशसुधारणेच्या मानाने पाहिलें असतां त्यांच्याकडून विद्यावृद्धीच्या कामाकरिता किती साहाय्य मिळतें हें आबालवृद्धांस माहीत आहेच.

(४) या देशांत श्रीमंतापेक्षा गरीबांची संख्या ज्यास्त आहे आणि विद्या शिकण्यास साधारणतः गरीबांचींच मुलें फार झटतात यास्तव ही अडचण दूर

व्हावी आणि अन्य भाषेचें ज्ञान संपादन करण्याचें साधन सर्वांस एकसारखें मिळावें हाहि एक माझा हेतु आहे.

नगर-वाङ्मय-मंडळाने या कामीं अवश्य लक्ष पुरवून कै. रूपसिंह यांची माहिती शोधून काढून आम्हाकडे पाठवावी. त्यांचें चित्र मिळाल्यासहि पाठवावें अशी आमची विनंती आहे. मोठमोठ्या विद्वानांसहि उदाहरण घालून देण्याजोगें जें काम रूपसिंहजी यांनी आपल्या **हिंदुस्थानी मराठी** कोशाच्या रूपाने करून ठेवलें आहे तें आपणा सर्वांस अत्यंत अभिमानास्पद असून अशा व्यासंगी पुरुषाचें आपण स्मरण ठेविलें पाहिजे असें वाटल्यावरून आम्ही ही हकीगत वाचकांस सादर केली आहे. बडोदें साहित्यसंमेलनाचे वेळीं हा ग्रंथ सर्वांस पाहण्याची सोय झाली असती तर बरें झालें असतें. डॉ. भट्टाचार्य यांच्या कृपेने आम्हास या अपूर्व ग्रंथाचें दर्शन घडलें याबद्दल त्यांचे आम्ही आभारी आहों. आमचे साहाय्यार्थी श्रीमंत रघुनाथराव रायरीकर, बी. ए. यांनी आमचेसाठी या कामीं फारच तसदी सोसली हें येथे नमूद करणें भाग आहे. आमच्या नक्कलकारास मुळांतील शब्द कोठें कोठें लागले नाहीत तथापि आमचें काम त्यावांचून फारसें अडण्यासारखें नाही.

द. वा. पोतदार.

---

## “ प्रस्तावना

देशाची उत्तम स्थिति होण्याला अनेक साधनें लागतात, त्यांमध्ये देशांत सद्-योग वाढणें हें मुख्य साधन होय. जसजसे देशांतील लोक सदुद्योगी होत जातील व विद्येच्या योगाने अनेक कलाकौशल्यें वाढवितील, तसतसा त्या देशाचा ऊर्जितकाल होत जाईल यांत संशय नाही. तथापि या सर्व गोष्टी उद्भवण्याला व वृद्धिंगत होण्याला सामान्यतः सर्व लोकांचीं मनें प्रफुल्लित आणि उद्युक्त झालीं पाहिजेत व अशी गोष्ट घडण्यास मुख्य साधन कोणतें हें उघडच आहे. ज्या देशाच्या लोकांची जी जन्मभाषा असेल त्या भाषेचेच अनेक सदाचारोत्तेजक ग्रंथ, व्याकरण, कोश, वर्तमानपत्रें, कला-कौशल्य शिक्षक वगैरेंची फारच आवश्यकता असते. जी देशभाषा नव्हे, तिचा त्या देशामध्ये कितीहि फैलाव झाला व कितीहि लोकांनी जन्मचे जन्म तिच्या अभ्यासामध्ये व प्रसारामध्ये घालविले, तथापि देशभाषेकडेस त्यांनी लक्ष दिल्यावांचून व्यर्थ आहे. म्हणून त्यांणी देशभाषेचा अनादर न करिता उत्तरोत्तर तिच्या उत्कर्षाविषयीं प्रयत्न करावा. आपण विद्यालयांत पुष्कळ शिकलों, पुष्कळ गोष्टींचे पोपट ज्ञान झाले, परंतु जर आपणांस भाषेचें मर्म समजत नाही किंवा दुसऱ्याच्या मनांत तें भरवून देतां येत नाही, तर अशा विद्वत्तेपासून देशाचें हित तरी कसें होणार? तेव्हा अशी विद्या पुष्कळ जरी वाढली, तरी उपयोगदृष्ट्या ती असून नसून सारखीच होय. तात्पर्य इतकेंच की, जी भाषा बालपणापासून आपणांस अवगत, ज्या भाषेच्या एका शब्दाने दुसऱ्या भाषेच्या दहा शब्दांचें काम होऊं शकतें व परभाषा शिकण्यास लागणारा जो काळ त्याच्या दशांशामध्ये जी भाषा चांगली येते तिजकडेस (दुर्लक्ष) केलें तर सर्व

विद्वत्तेचा व्हावा तसा कधींहि उपयोग होणार नाही. यावरून (परभाषा) शिकूं नये असें कोणीहि समजूं नये. आपल्या व परक्यांच्या देशामध्ये ज्या भाषा अत्युपयुक्त व देश-वैभव वाढविण्यास कारण असतील त्यांचा साधेल तसा अवश्य अभ्यास करून त्यांपासून आपल्या देशाचे हित करणें अतिशय आवश्यक आहे. याकरिता केवळ आपल्याच देशांतील नव्हे, पण सर्व पृथ्वीवर सर्वोत्कृष्ट अशी संस्कृत भाषा, तशाच हिंदुस्थानी, बंगाली, कर्नाटकी, तैलंगी वगैरे भरतखंडांतील इतर भाषा, व सांप्रतच्या राज्याधिकाऱ्यांची फारच उपयुक्त अशी इंग्रजी भाषा आणि विद्याकलादिकांच्या वृद्धीस फार उत्तेजन आणणारीं जीं पुस्तकें लिहिलीं आहेत अशा इतर देशभाषा, त्यांचा होईल तितका अवश्य अभ्यास अशा लोकांनी केला पाहिजे. परंतु या सर्वांचा जरी अभ्यास केला, आणि स्वभाषेकडेस दुर्लक्ष केलें, तर त्या सर्व भाषांचा योग्य उपयोग होणार नाहीच. आणि ज्याला स्वभाषा चांगली येते, त्यांना परभाषा शिकण्यास जितका परिश्रम व काळ लागेल, त्याच्या चौपट परिश्रम व काळ वेचल्याविना स्वभाषा न येणाऱ्या मनुष्यास परभाषा कधींहि चांगली येणार नाही. बरें, इतकाहि श्रम करून शेवटी स्वभाषा नाही ती नाहीच. तेव्हा अशा अयुक्त कृत्यापासून देशाचे वास्तविक हित न होतां, श्रम आणि काळ यांचा मात्र व्यय होतो. यासारखी दुसरी हानि कोणती ?

या स्थितीपासून दुसरी याहूनहि मोठी हानि होण्याचा फारच संभव आहे व तो खरा खोटा पहाण्यास फार लांब जाण्यास नको. सांप्रत आपल्या चालू राजकर्त्यांची जी इंग्लीशभाषा, तिच्या अभ्यासापासून चार पैसे मिळून संसारिक कृत्यास मदत होऊं लागल्यामुळे, जो तो स्वभाषेचा अनादर करून इंग्रजी शिकूं लागला. यामुळे इंग्रजी जाणणाऱ्यांची संख्या मात्र पुष्कळ झाली, पण बहुतेकांचें हित न होतां बहुतेक लोक निरुद्योगी होऊन धंदे नाहीसे झाले. ज्यांना खरोखरी इंग्रजीचें चांगलें ज्ञान झालें आहे, त्यांतील बहुतेकांना स्वभाषेच्या अज्ञानामुळे, त्या शिकण्याचा कांहीच स्तुत्य उपयोग करतां येत नाही. इंग्रजी लिहिणारांपैकी बहुतेकांस आपली स्वभाषा लिहिण्याची मोठीच मारामार (पडते). कित्येक तर उघडपणें बोलतात की, 'आम्ही हल्लीं आपली स्वभाषा विसरलों.' ते म्हणण्यामध्ये त्यांना मोठी प्रतिष्ठा वाटते. हा प्रकार स्वभाषेकडे दुर्लक्ष केल्यामुळे होतो. अशा प्रकारच्या विद्वानांची जर संख्या सध्याच्या प्रमाणानेच वाढत गेली, तर वीस पंचवीस वर्षांच्या आंतच या आपल्या देशास महाराष्ट्र (अथवा) मराठी भाषा बोलणारांचा देश, हें नांव अगदी अयोग्य ठरेल यांत संशय नाही.

वर सांगितलेली मराठी भाषेची किंवा भरतखंडांतील इतर भाषांची दशा व त्यांचा द्वेष सांप्रत कोठवर पोहोंचला आहे, हें सूक्ष्म विचाराने पाहिलें असतां हिंदुस्थानी, मराठी किंवा इतर स्वभाषेचा कळवळा बाळगणाऱ्यांना खरोखरी दुःख झाल्यावांचून राहणार नाही. देशभाषेविषयी जी कल्पना सांप्रत आपल्या लोकांच्या मनांत आहे, ती

तशीच चालण्यास कालेंकरून अन्य भार्षेतील शब्दांचे तींत (मिश्रण होऊन) एखादे वेळीं ती नाहीशीच होऊन जाईल. आज चार पांच हजार वर्षांच्या वसाहत झालेल्या देशांत सर्वत्र प्रचारांत अग्रभाषा काय ती संस्कृतच होती. तिच्या आधाराने व परदेशीय राज्यकर्त्यांच्या प्रवेशाने अनेक भाषा देशांत चालू झाल्या. तथापि त्यांत स्वतःसिद्ध अशी जी संस्कृत तिची बरोबरी करणारी कोणतीहि नाही. कांही अंशी ती योग्यता पावण्यास पात्र अशी आपली महाराष्ट्र व हिंदुस्थानी या भाषा दिसतात. आता उत्तर व मध्य हिंदुस्थानांत.....पंजाबी, मुलतानी, सिंधी, हिंदी आणि मारवाडी या भाषा चालू आहेत. अलीकडे पूर्वेस गुजराती व बंगाली, महाराष्ट्रांत मराठी, दक्षिण दिशेस कर्नाटकांत कानडी व तैलंगणांत तैलंगी, तामील, तुलु, गोंडवणी आणि कित्येक ठिकाणीं मल्याळी, सिंव्हल, पोर्टुगीज, फ्रेंच, फारसी व राज्यव्यवहारांत सर्वत्र इंग्रजी वगैरे अनेक भाषा चालू आहेत. अशा अनेक भाषांनी युक्त असा हा देश असतां यांतील पुस्तकें व वर्तमानपत्रें यांची तुलना इंग्लंड देशांतील एका (वर्षांत) सध्याच्या मानाने प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांच्या दशांशासहि लागणार नाही. कारण आमच्या लोकांचा दुरभिमान व भाषेविषयी अज्ञान. आपल्या देशांत महान् विद्वानांनी संस्कृतांत अनेक ग्रंथ केले आहेत. त्यांस उदयास आणण्यास भाषाभिलाषी पुरुषांनी जर प्रयत्न केला तर लोकांचे मोठे हित होईल. ज्या संस्कृत भाषेच्या प्रौढीविषयीं व्यासासारखे तर राहू द्या पण अलिकडचे कालिदास, भवभूति आदि रसिक काव्यकार, सांप्रत सर्व विद्यांचें स्थान (असलेल्या) इंग्लंड देशांतील महान् विद्यापरायण, अनेक भाषाभिज्ञ आणि शोधक असे मेसर्स जोन्स, उलकिन्स, कोलब्रुक, प्रोफेसर वेबर, उइलियम इत्यादि अनेक जन पवाडे गाऊन त्या भाषेस अगदी लुब्ध झाले आहेत व जी देशीं पवित्र मानलेली संस्कृत भाषा, गंगा गोदा कृष्णा यमुना इत्यादि नद्यांच्या तीरीं वास करणारी, तिने सांप्रत टेम्स डान्युब इत्यादिकांच्या तीरीं वास करावा, हें आपल्या सर्वोत्कृष्ट मानलेल्या देशास लाजिरवाणें नव्हे काय? पूर्वी भोजविक्रमादि राजांनी या भाषेस चांगल्या प्रकारें भरभराटीस आणून सोडलें होतें. परंतु आपल्या लोकांच्या दुर्लक्षामुळे तिची पूर्वस्थिति राहिली नाही. प्राकृत भाषेविषयी तेव्हापासूनच शास्त्री, पंडित इत्यादि विरुद्ध पक्षी असत. तथापि पुढे ज्ञानेश्वर, मुकुंदराज, श्रीधर, मुक्तेश्वर, मोरोपंत, तुकाराम इत्यादि तत्त्वज्ञ व परोपकारी विद्वज्जनांनी तिला विद्यामृत पाजून ती मोठी विद्यामंदिरांत व महान् महान् पंडितांच्या समागमास योग्य अशी करून टाकली. नंतर दिवसेंदिवस सर्व महाराष्ट्रभर जर इला साहाय मिळत गेले असतें तर तिची आणि तिची माता जी संस्कृत भाषा हिचीहि बरोबरी आज झाली असती. पण प्रारब्धाची गति अतर्क्य. पहा इंग्लीश भाषा आणि तिचें वैभव. या भाषेंत लक्षावधि वर्तमानपत्रें व कोट्यवधि पुस्तकें बिनधोक प्रसिद्ध होतात व तेवढ्यांचाहि खप राजापासून रंकापर्यंत मोठ्या आस्थेने होतो. आपल्या सर्व हिंदुस्थानांत, तेथील एखाद्या खेड्यांत निघणाऱ्या पुस्तकाइतकीं पुस्तकें किंवा पत्रें देखील प्रसिद्ध होत नाहीत. याचें कारण

आपल्या लोकांची विद्येविषयीं अनास्था हें होय.

सूक्ष्म रीतीनें पाहिलें असतां देश सुधारण्यास विद्यावृद्धि हेंच मुख्य कारण, आणि ती होण्यास ग्रंथादिकांची प्रसिद्धि फारच झाली पाहिजे. आता हें काम सिद्धीस जाण्यास आपल्या लोकांस सर्व गोष्टींची प्रतिकूलता आहे असें केवळ नाही. ईश्वरकृपेने आपल्या लोकांत मोठमोठे कामगार म्हणजे प्रिन्सिपल सदर अमीन, हायकोर्टचे ट्रान्सलेटर, डेप्युटी रजिस्ट्रार, अटर्नी, सबार्डिनेट जज्ज, इंजिनियर व कॉलेजकडील प्रोफेसर, दफ्तरदार, मामलतदार, पोष्टमास्तर, हेडमास्तर-हायस्कूल, हेडक्लॉर्क, अकाउन्टंट, स्कूलमास्तर, क्लार्क आदिकरून लहानथोर कामगार सुमारें तीन हजार असतील, पण त्यांच्या मोठ्या पगाराच्या मानाने किंवा देशसुधारणेच्छेच्या मानाने पाहिलें असतां त्यांच्याकडून विद्यावृद्धीच्या कामाकरितां किती साहाय्य मिळतें हें आबालवृद्धांस माहीत आहेच. म्हणून त्याचें स्पष्टीकरण करण्याचें विशेष प्रयोजन दिसत नाही. कारण आज आपल्या देशाची स्थितीच तशी आहे. एखाद्याने एखादें उपयुक्त पुस्तक लिहिलें त्यास यांतून कितीजण साहाय्य करतात हें जगप्रसिद्धच आहे. एकेकांनी एकेकच प्रत घेतली तर हजारों पुस्तकें खपण्याचा संभव आहे. दुसरी आमची स्थिति अशी आहे की, ज्यांस संस्कृत येतें त्यांस प्राकृत येत नाही. प्राकृत येणारास संस्कृत समजत नाही. जो पहावें तो एवढें मात्र म्हणतो की, त्यांत काय मनोरंजक, इंटरेस्टींग किंवा हितावह आहे किंवा नाही. आपल्या देशाची स्थिति खरोखर सुधरावी अशी जर आपल्या देशबांधवांची इच्छा आहे तर देशभाषेची भरभर पुस्तकद्वारा झाली पाहिजे.

संस्कृत भाषेचें अध्ययन सुलभ व्हावें या गोष्टीकडे दिवसेंदिवस लोकांचे लक्ष लागत चाललें आहे, ही आनंदाची गोष्ट होय. संस्कृताच्या, हिंदुस्थानीच्या आणि फारशीच्या अभ्यासास उत्तेजन मिळाल्यापासून त्या त्या भाषेचें ज्ञान करून घेण्याचीं साधनेंहि वाढत चाललीं आहेत. आपल्या देशांतील प्राचीन भाषांचे व विद्यांचे पुनरुज्जीवनहि करण्याचा उद्योग आपल्या दयाळु व सूज्ञ सरकारांनी मनावर घेतला आहे ही एक मोठ्या आनंदाची गोष्ट समजली पाहिजे. पूर्वी आपल्या पूर्वजांचे लक्ष भोजविक्रमादि भाषाविलासींच्या कारकीर्दींत विशेष लागलें होतें असें अनुमानानें समजतें. आणि त्यांनीं आपल्या कल्याणार्थ भाषाभिज्ञ व व्याकरणशास्त्रकार यांपासून अनेक प्रकारचीं पुस्तकें करून ठेवलीं आहेत. यांनी आपल्या बुद्धिसामर्थ्यानुसार शब्दनियमांची म्हणजे व्याकरणाची व्यवस्था केली. इंद्र, चंद्र, काशकृत्स्न, शाकटायन असे प्राचीन वेळीं वैय्याकरण होऊन गेले. यांचीं नांवें बोपदेव कृत कविकल्पद्रुम नामक ग्रंथाच्या प्रस्तावनेंत दिलीं आहेत. सर्व व्याकरणकारांमध्ये कालमान पाहिलें असता इंद्र[1] हा पहिला होय. या नंतर बराच काळ लोटल्यावर पाणिनीचा उदय झाला. यास संस्कृत व्याकरणाचा पिता असे एका विद्वानाने म्हटलें आहे. पाणिनीने अष्टाध्यायी नामक

१ आर्यविद्यासुधाकर. पृष्ठ २९.

अत्युत्तम, अप्रतिम व अमोलिक व्याकरणग्रंथ रचिला. वेदाची जीं सहा अंगें आहेत त्यांत ह्याच्या ग्रंथाची गणना आहे. या शिवाय शाकल्य, गार्ग्य, गालव...इत्यादि वैय्याकरणी झाले व हरदत्त मिसर याने पदमंजरी भट्टोजी दिक्षीताने सिद्धांतकौमुदी, हरि दिक्षीत याने लघुशब्द....भर्तृहरीने वाक्यप्रदीप, कालिदासाने अनेक उपयुक्त आणि मनोरंजक पुस्तकें, पतंजलीने महाभाष्य इत्यादि विद्वानांनीं अतिशय श्रम घेऊन आपल्याकरिता हजारो उपयुक्त पुस्तकें लिहिलीं आहेत. परंतु आपल्या दुर्लक्षामुळे तीं तशींच पडलीं आहेत. पण अलीकडे त्यांचा ऊर्जितकाळ येत चालला आहे हें आपल्या देशाचें एक शुभ चिन्हच समजलें पाहिजे. पूर्वी सांगितलेंच आहे की, भरतखंडांतील देशभाषांची माता ही संस्कृत भाषा आहे. राज्याच्या क्रांतीमुळे मूळ भाषेंत फेरफार होऊन इतर भाषा झाल्या. प्रत्येकास माहितच असेल की, संस्कृत भाषेंतील हजारों शब्द हिंदीं, वृज, हिंदुस्थानी, तैलंगी, तामीळ, कर्नाटकी इत्यादि भरतखंडांतील (भाषांत) मिश्रित आहेत. त्याचप्रमाणे कित्येक शब्द फारशी भाषेंत आहेत असें दिसतें, परंतु त्यांच्या शब्दोच्चारांत मात्र थोडेसें अंतर असतें. यांची अनेक उदाहरणें कोशांत लिहिलीं आहेत, हें शिकणारांच्या सहजच लक्षांत येईल. सारांश, संस्कृताचे प्राकृत, प्राकृताचे कोंकणी, तैलंगीचे द्राविडी इत्यादि अनेक भाषाभेद झाले. यावरून सहजच अनुमान करतां येतें की, मूळ भाषा ही संस्कृत असून तिच्या ह्या सर्व पल्लव आणि शाखा होत. आपल्या लोकांच्या अनास्थेमुळे म्हणा किंवा ती सर्वोत्तम व जगमान्य भाषा कठीण असल्यामुळें म्हणा आपली भक्ति तिजवर बसली नाही म्हणून आपलें शास्त्र आपणांस समजत नाही. आणि दिवसेंदिवस तिच्या पूर्वस्थितीचा लोप होत जाऊन ती अगदी नाहींशीं होत चालली होती. पण आपले राज्यकर्ते विद्यावृद्धेच्छु असल्यामुळे तिचें पुनरुज्जीवन होत चाललें आहे. हीच गोष्ट मराठी, हिंदुस्थानी, तैलंगी, कानडी, गुजराथी इत्यादि भाषेस लागू पडते. आपण या देशांत जन्मलों म्हणून जी भाषा आपण हल्लीं बोलतो तिचें ज्ञान आपणांस जर उत्तम असलें तर (इतर) भाषा शिकण्यास फारशी अडचण पडणार नाही. यास्तव आपल्या........भाषेचा आपण चांगला अभ्यास करावा हें आपणांस योग्य आहे.

हल्ली मराठी, संस्कृत, फारशी, हिंदुस्थानी, गुजराथी, तामीळ, तैलंगी इत्यादि भाषेंत विद्या, कला आदिकरून विषयांवर बरेच ग्रंथ झाले आहेत. परंतु त्यांत मोठे आश्चर्य हें आहे की, सकल ग्रंथास आश्रयभूत जी महाराष्ट्र भाषा तींत अन्यभाषेचें अर्थज्ञान, मर्म इत्यादि पहाण्याकरिता जो कोशरूप आदर्श त्याची प्रवृत्ती अद्यापी झाली नाही. याचें कारण काय तें (नीट) ध्यानांत येत नाही. परंतु तो प्रसिद्ध होण्यास दोन मुख्य अडचणी माझे दृष्टोत्पत्तीस येतात. याशिवाय आणखी किती असतील त्या न कळे. त्या अशा की, प्रथमतः जो कोणी कोशरूप आदर्श वर सांगितलेल्या (प्रकारें) करावयास बसेल त्यास विद्वज्जनांचे सहाय, उपयुक्त ग्रंथांचा आश्रय, द्रव्याश्रय, निरनिराळ्या भाषेंत स्पष्टीकरण करण्याचें (सामर्थ्य) श्रम व दुसरे, यथाशक्ती इतकेंहि अतिशय

श्रम करण्यास एखादा तयार झाला असता पुढे त्याच्या प्रेमाचें योग्य फळ त्यास प्राप्त होईल किंवा ( नाही या ) विषयी त्यास मोठी चिंता असते. या कारणावरूनच शुद्ध महाराष्ट्र भाषेंत आजदिनपर्यंत हिंदुस्थानी व मराठी कोश प्रसिद्ध झाला नसावा. पुष्कळ वर्षांपासून माझ्या मनांत हिंदुस्थानी व मराठी कोश करावा असें घोळत होतें व ईश्वरकृपेने आणि माझ्या विद्वान् तीर्थरूपांच्या साहायाने त्याची पूर्तता झाली म्हणून महदानंद वाटतो. विचारांती कोश करण्याचें काम किती कठीण आहे हें सांगण्याचें विशेष प्रयोजन दिसत नाही. कारण कोशांत, गूढ, सखोल आणि गुरुगम्य ग्रंथांतील शब्दांचे अचुक, नीट, यथार्थ व सुत्रक महाराष्ट्र भाषेत अर्थ दाखविणें हें मोठे बिकट काम होय. तथापि शब्दांचे पृथक् पृथक् अर्थ दर्शविण्याकरिता माझ्याने होईल तितका प्रयत्न केला आहे. केव्हा केव्हा भाषांतर करतांना एक एक शब्दाकरतांसुद्धा प्रहरांचे प्रहर मोडावे लागतात, आणि इतकेहि करून भाषांतर मनाजोगते होत नाही.

असा अनुभव पुष्कळांस आला असेल. त्या प्रमाणेच कोश करण्याचा व्यवसाय कठीण आहे. ज्यांस नुसतें मराठी येतें त्यांची इच्छा जर हिंदुस्थानी शिकण्याची झाली तर ती भाषा गुरूकडून शिकतेसमयीं यास मोठे प्रयास पडतात. कारण ती भाषा शिकविणारे बहुतकरून मुसलमान असतात. म्हणून शिष्याची भाषा गुरूस आणि गुरूची शिष्यास बरोबर समजत नसल्यामुळे उभयतांसहि त्रास उत्पन्न होऊन ती भाषा शिकण्याची त्यांची इच्छा नाहीशी होते. आणि या कारणावरून ते ती भाषा शिकण्याचें सोडून देतात. हा कोशरूप आदर्श जर नूतनाभ्यास्थांच्या (जवळ) असला तर गुरुजीपाशीं अध्ययन करीत असता समजुतीकारिता आपण ज्या गोष्टीची टिपणें किंवा शब्दार्थ लिहून घेतों त्यांतील बहुतेकांचा यांत समावेश केला आहे. कोश करण्याचा माझा मुख्योद्देश इतकाच की, हिंदुस्थानी भाषेचें ज्ञान आपल्या भाषेंत चांगलें होऊन शिकणारांची अडचण बहुअंशीं दूर व्हावी म्हणून शक्तिनुसार अत्यंत श्रम घेतले आहेत. हाच कोश जर हंटेरियन सिस्टिमप्रमाणे रोमन क्यारेक्टर्समध्ये आपल्या सूज्ञ व परोपकारी इंग्लीश ग्रंथकारांनी कृपा करून छापविला तर इंग्लंडांतून येणाऱ्या सिव्हिल आणि मिलिटरी साहेब लोकांस बहुअंशीं उपयुक्त होईल.

आता कोश करण्याचें मुख्य कारण काय झालें हें माझ्याने सांगितल्यावांचून राहवत नाही. म्हणून येथे थोडेंसें लिहिणें आवश्यक आहे. माझे प्रिय तीर्थरूप सुंदरसिंह यांस मराठी, हिंदुस्थानी, फारशी, वृज आणि संस्कृत या भाषा बऱ्याच अवगत होत्या. आणि त्या त्या भाषा मी शिकाव्या म्हणून वारंवार मला ते उत्तेजनपर बोध करीत असत. माझ्या विद्वान् तीर्थरूपांनी मजला थोडेंसें [ त्यांच्याकडे साहेबलोकांचीं अत्युत्तम सर्टिफिकीटें होतीं. ] मराठी व हिंदुस्थानी शिकविलें होतें.....त्यांनी मुनशीगिरी केली होती म्हणून त्यांची शिकविण्याची शैली सर्वोत्कृष्ट होती. एकदा मी माझ्या मित्रांस त्यांच्यासमक्ष इंग्लिश व हिंदुस्थानी भाषेचे शब्द सांगत बसलों होतों आणि (ते मित्र) लहानशा चोपडीवर उतरीत होते. इतक्यांत मोठ्या आनंदाने तीर्थ-

४.६

रूप म्हणाले की, तुम्ही जर महाराष्ट्र भाषेंत हिंदुस्थानीचा कोश आणि हिंदुस्थानींत इंग्लिश भाषेचा कोश कराल तर तो निःसंशय बहुमान्य होऊन देशहितकारक होईल व हजारों नुतनाभ्यासी आणि त्या त्या भाषा शिकणारे लोक तुमचे उपकारी होतील. हें ऐकतांच कोश करण्याचें काम किती कठीण आहे हें मी त्यांस सांगितलें. परंतु कोश करण्याविषयी त्यांचा दृढाग्रह असल्यावरून त्यांची आज्ञा मान्य करून त्यांस विनंती केली की, आपण जर मला सहाय्य कराल तर शक्तीनुरूप मीहि कठीण कामें करीन. असें म्हटल्याबरोबर त्यांनी मोठ्या संतोषाने माझी विनंती मान्य केली. हिंदुस्थानी व मराठी कोश करण्याविषयी माझ्या विद्वान तीर्थरूपांनी आणि दुसऱ्या इष्टमित्रांनी आग्रह केल्यावरून मीहि असा विचार केला की, मराठी भाषेंत अन्य भाषेचे कोश नाहीत म्हणून शोक मानीत निराश बसणें हेंहि रास्त नाही. असें माझ्या अल्पमतीस वाटल्यावरून, शक्तिनुसार प्रयत्न करून पहावें, मग जितकें व जसें साध्य होईल तसें होवो, असा दृढनिश्चय करून कोश करण्याचें अत्यंत श्रमाचें काम आरंभिलें. आपले हातून जितका लोकांस उपयोग पडेल मग त्याचें मान कितीहि असो वा नसो. तो जर हितावह आहे, तर तितका करण्याविषयी किमपि आळस केला नाही. ज्या कोणांस एतद्देशीय निरनिराळ्या भाषेच्या कोशाचा उपयोग समजला आहे, त्या सर्वांच्या मनांत, लहान मुलापासून तर थोर अधिकाऱ्यापर्यंत (असा कोश) असावा अशी इच्छा आहे. परंतु ती त्यांच्या मनांतच राहिली आहे. ज्यांचे स्वाधीन आपली इच्छा परिपूर्ण करून घेण्याविषयी सामर्थ्य आहे, तेहि अद्यापि तें काम करून घेण्याचे भरीस पडले नाहीत. प्राचीन आणि अर्वाचीन कोशकर्ते, शब्दशास्त्रनियंते व व्याकरणकर्ते इत्यादि ग्रंथकार प्रसिद्ध झाले. त्यांनी अत्यंत परिश्रम केले म्हणूनच संस्कृत, प्राकृत, अरबी, फारशी, गुजराथी, हिंदुस्थानी, तामिळ, इंग्लिश इत्यादि भाषा इतक्या प्रगल्भ दशेस येऊन, विद्वज्जनचित्तचकोरास चंद्रीभूत होऊन, प्रसिद्ध झालेले ग्रंथकार, कवि व कोशकर्त्यांच्या वाग्देवतेस रम्यस्थानाई झाल्या. नाहीतर त्यांस मार्दवदशेस....हे दुर्निवार जाल उकलून, त्या सूत्रांनी विणून, सिद्ध केलेला पट तो कोशकर्ते व कविजन चित्रकारांच्या अनेक सुरस रंगभरीत कल्पनांस लेखनाई झाला नसता. प्रसिद्ध कोशकर्ते मोल्सवर्थ क्यांडीसाहेब यांचा इंग्रजी आणि मराठी कोश पाहून सर्वांस किती आनंद होतो. त्याप्रमाणेंच रावबहादुर दादोबा पांडुरंग यांचें मराठी व्याकरण पाहून सर्व एतद्देशीय लोक त्यांच्या अनुपमेय परोपकारांचे गुण गातात. हीं अपूर्व कामें झालीं म्हणून सर्व लोक मानतात. जर त्यांनी अत्यंत....... सर्वांस त्या उत्तम कोशापासून अमोलिक लाभ नित्यशः होतात ते झाले नसते. हा व अन्यभाषेचे कोश गरीबगुरीबांस मिळणें दुर्लभ झाले आहेत. कारण या देशांत श्रीमंतांपेक्षा गरीबांची संख्या जास्त आहे आणि विद्या शिकण्यास साधारणतः गरीबांचींच मुलें फार झटतात. यास्तव ही अडचण दूर व्हावी आणि अन्यभाषेचें ज्ञान संपादन करण्याचें साधन सर्वांस एकसारखें मिळावें हाहि एक माझा हेतु आहे. या

कोशास मुख्य आधार मेसर्स जॉन् शेक्सफीअर, डंकन फार्ब्स यांचा हिंदुस्थानी आणि इंग्लिश कोश, अमरसिंहाचा अमर कोश आणि दुसरे फारसी, हिंदुस्थानी आणि वृज भाषेंतील पुस्तकांचा होय.

या अनेक शब्दरत्नाकरांतून मीं कांही मुक्ताफळें अतिशय श्रमाने वेचून कोशरूप माळा गुंफिल्या आहेत. याजविषयी विद्वानांस, देशबांधवांस, भाषाभिलाष्यांस आणि इतर सूज्ञ व भाषामर्मज्ञान जाणणाऱ्यांस माझी करद्वय जोडून विनयपूर्वक हीच विनंती आहे की, श्रीमंत आणि राजे लोक मोत्यांचे हार कंठीं घालतांना त्याच्या सहवासाने राहणारा जो सुताचा हलका दोरा त्यासहि जसा मान देतात, तसा या शब्दमालिकेचा आदर करावा. कारण मीं आपल्या अल्पबुद्धीरूप सुताच्या दोऱ्याने श्रीमंतांच्या भांडारांतील मौल्यवान् मोतीं घेऊन ह्या माळा गुंफिल्या आहेत. म्हणून माझ्या अल्पबुद्धीच्या दोषांकडे विशेष लक्ष न देतां श्रीमंतांच्या भांडारांतील मोत्यांच्या गुणांकडे पाहून गुण मात्र ग्रहण करावे. वस्तुतः यांत लक्षावधि दोष असतील ! महाराष्ट्र भाषा ही कांहींअंशीं माझी स्वभाषा नसून तिचें मर्मज्ञान, शब्दज्ञान व त्यांची माहिती, विचारांची परिपूर्णता आणि सरळ, सरस, वेधक व प्रगल्भ भाषा लिहिण्याची शक्ति इत्यादि गोष्टींचा अभाव माझ्याठायीं पूर्णतेने वास करीत आहे.

या कोशास आरंभ १८७० सालीं होऊन व त्याची पूर्णता १८७८ सालांत ईश्वरकृपेने झाली. इतकीं वर्षे लागण्याचें कारण इतकेंच की, मीं ताबेदार असल्यामुळे सरकारची वक्तशीर नौकरी करून फुरसतीच्या वेळांत शक्तिनुरूप थोडे थोडे शब्द लिहीत होतों, म्हणूनच इतका दीर्घकाल लागला. याशिवाय मला स्वतः लिहिण्यास अतिशय श्रम पडले आहेत, म्हणून बांधवांस आणि विद्वज्जनसमूहास हीच विनंती आहे की, माझ्या दीर्घकालीक अत्यंत श्रमाचें सार्थक करण्याचे कामीं मनापासून झटावें. म्हणजे दीनावर त्यांचे महदुपकार होऊन माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें मी समजेन. देशहिताकरता माझ्याने जितकें करववलें तितकें म्यां केलें. परंतु तें आता (मनांत) आणून लोककल्याणार्थ त्याची प्रसिद्धी करणें हें आपल्या दयाळु व विद्यावृद्धेच्छु इंग्लिश सरकाराकडे आहे. कारण आजपर्यंत महाराष्ट्र भाषेंत या प्रकारचा कोश झाला नव्हता.

हा कोश करतेसमई मला ज्या ज्या शंका किंवा अडचणी आल्या त्या त्या वक्तशीर निवारण करण्याच्या कामीं माझ्या विद्वान तीर्थरूपांनी आणि बंधूंनीं पराकाष्ठेचे श्रम घेतले म्हणून त्यांच्या महदुपकारांचें स्मरण केल्यावांचून माझ्याने राहवत नाही. लिहिण्यास अतिशय दुःख वाटतें की, माझा प्रियबंधु लछमनसिंह यांस तारीख १७ वी जुलई १८७८ रोजीं महामारीचा उपद्रव होऊन परलोकवास झाला. तरुण व विद्वान पुत्राच्या अकालीक मरणामुळे तीर्थरूप अत्यंत दुःखी होऊन त्यांनीहि तारीख २८ आगस्ट १८७८ रोजीं देहत्याग केला. त्या उभयतांची इच्छा ह्या

कोशाची प्रसिद्धी होण्याविषयीं फारच होती, परंतु माझ्या दुर्दैवामुळे ती त्यांच्या मनांतच राहिली. अस्तु ईश्वरेच्छा.

यालगत कोश उघडण्याची किल्ली दिल्ही. तींत हिंदुस्थानी मूळाक्षरांचे उच्चार स्पष्टपणें महाराष्ट्र भाषेंत लिहिले आहेत. त्यावरून सर्व देशबांधवांनी ती किल्ली हातीं घेऊन हा कोशरूप आदर्श उघडावा, ही नम्रतापूर्वक विनंती आहे. ह्या पुस्तकावर परमदयाळु परमेश्वराचा आशीर्वाद असो.

रूपसिंह सुंदरसिंह
क्लार्क, कलेक्टर्स आफीस
अहमदनगर.

टीपः— प्रस्तावनेची वरील नक्कल मधून मधून किंचित् त्रुटित आहे. संदर्भ शक्य तोंवर कंसांत आम्ही दर्शविला आहे. लेखकाची मातृभाषा मराठी नाही हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. त्याची कळकळ व परिश्रम हीं फारच वाखाणण्यासारखी आहेत, यास्तव त्यांस सांभाळून घेणें हेंच थोरपणास उचित होईल. — संपादक.

---

# आश्विनांतील गाणीं

( इकडील प्रांतांत आश्विन महिन्यांत अडाणी लोकांत "भुलाई" मांडण्याचा प्रघात आहेत. त्यावेळीं बऱ्याच मुली घोळक्याने घरोघर गाणीं म्हणत हिंडतात. हा त्यांचा कार्यक्रम सरासरी पंधरा दिवस चालू असतो. कोजागिरीचे दिवशीं रात्रभर भुलाईपुढे ( गौरीपुढे ) ह्या मुली गातात व पंधरा दिवसांत पसापसा मिळालेलें धान्य व पै पैका खर्चून देवीला नैवेद्य दाखवितात व तिथेच सहभोजन करतात. अशावेळीं घरोघर गाइलेल्या गाण्यांपैकीं खालील तीन गाणीं संग्रहीत केलेली आहेत. अर्थ, रस आणि शब्दशुद्धता या दृष्टीने तीं कमी दर्जाचीं वाटलीं तरी मधुर, गेय आणि नाविन्यपूर्ण आहेत. ( संग्राहक )

### गाणें १ लें

काकडी दुधमाय वो । दुधमाय वो
तपविली, काळी पिवळी शाई
सौभाग्याचे वो । माझ्या लाडाचे
गौराई, अंघोळ करुन वो
शोभा लेवून जाय ॥

मी कशि लेवूं वो। शंकर लागले वाटे
शंकर नव्हते वो सांगाती
मजला टाकून जाती
काकडी दुधमाय वो

## गाणें २ रें

कोवळी काकडी, दोघी सखू खाऊ ॥ धृ ॥
एक सखु रुसली। घराकडं गेली
घरचा पडूला। दारीं नाहीं दिवा
त्याही दिव्याला। ठसके मोठे
ठसकू ठसकू वो। चांधावरी
चांधाचे चंचूळा। आम्हावरी वो
आमचा खेळ हा। आसनीवरी वो
आसनी माय होऊं दे।
वाजदे तसं वाजूं दे
आमचा खेळ साधू दे
आमचा खेळ रातीचा। दिवीयाच्या जोतीचा.

## गाणें ३ रें

राई वो राई वो आम्ही खेळूं राई वो
राईंत देल्ला वहुल्याले। वहुल्याले
एकका गौरी उरपतली। उरपतली
तेथि कां होता डोम्या नाग। डोम्या नाग
डसला मधल्या बोटाला। बोटाला
धांवत आली सासऱ्यापाशीं। सासऱ्यापाशीं
तुम्हां कां लागीयेली झोंप।—येली झोंप
आम्हां कां लागीयेले पान।—येले पान
आधीं कां करुशना देव।—शना देव
मग कां उजरुं तुझं पान। तुझं पान.

संग्राहकः— वि. वा. जोशी, चांदा

ता. १०-१-३५

---

.५२०

# आजचें जपानी वाङ्मय

दरसाल जपानांत जितकी वाङ्मयाभिवृद्धि होते तितकी दुसऱ्या कोणत्याहि देशांत होत नाही. अमेरिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांच्या दुप्पटीने जपानमध्ये पुस्तकें निघतात. गुदस्त १०,००० वर प्रकाशन झालें. त्यांमध्ये २७०० ग्रंथ शिक्षणावर, २५०० साहित्यावर, १९०० अर्थशास्त्रावर, १२०० विद्यालयीन व सुमारें १००० घरगुती विषयावर होते. १००० वर ग्रंथ धर्मासंबंधी होते, पण त्यांत धर्माचें विवेचन केवळ तात्त्विक, क्रियाहीनपर नसून कर्मयोगी व राष्ट्रीय बाणा शिकविणारें आहे. तसें पाहिलें तर अलीकडचें सर्वच जपानी वाङ्मय राष्ट्रीय वृत्तीचें असतें. प्रत्येकांत कोठे ना कोठे तरी देशहिताचें सूत्र बाहेर दिसतें; मग तें पुस्तक युद्धावरचें असो की धर्मावरचें असो. इतिहास आणि साहित्य या विषयांवरचीं पुस्तकें देशाभिमानाने रसरसलेलीं असतात, हें सांगणें नकोच.

जपानांत जें प्रमुख वाङ्मयसंप्रदाय आहेत, त्यांपैकी पहिल्या प्रतीचा व अत्यंत लोकप्रिय संप्रदाय म्हणजे 'तैशु बुंगेल' होय. याचें ध्येय बहुजन समाजासाठी वाङ्मयनिर्मिति हें असून, या ध्येयामुळे साहाजिकच देशभक्तीची छटा संप्रदायांत उठून दिसते व जनतेचें अंतःकरण या संप्रदायाकडे ओढलें जातें. सवंग लोकप्रियता कोणास नको आहे! जपानी तरूण पदवीधर तिच्यामागे कां बरें लागणार नाहीत? याचा परिणाम म्हणजे तरूण लेखकांनी सामान्य लोकासाठी लिहिलेलीं सामान्य विषयांवरचीं असंख्य पुस्तकें. जुन्यापुराण्या कथापुराणांना नवीन रंगऽफेती देऊन नवें क्रांतिकारक वाङ्मय म्हणून बाजारांत ठेवलेलें आढलेल. हेंच राष्ट्रीय वाङ्मय; पण हें मजुरांच्या जिव्हाळ्याचें असून, सत्यनिदर्शनावर याची फार भर आहे. गेल्या महायुद्धानंतर मजूर वाङ्मय तयार करणारे बरेच लेखक निर्माण होऊन त्यांची फार चहा झाली.

या संप्रदायाला विरोधी संप्रदाय म्हणजे 'केवळ कलेसाठी कला' या तत्त्वाचें प्रतिपादन करणाऱ्या लेखकवर्गाचा. आपणाला मजुरांभोंवतीं गुंजारव करावयाचा नसून शुद्ध साहित्याची उपासना कर्तव्य आहे व आपली निर्मिति तीच खरी कला, असें या कलासंप्रदायांचें म्हणणें आहे. 'याकोमित्सु रिइशी' हा एक असा प्रख्यात कलासंप्रदाय आहे.

आणखी एक महत्त्वाचा संप्रदाय राहिला. तो म्हणजे शास्त्रीय लेखकांचा. जगाची आधुनिक लोकोत्तर प्रगति बहुंशीं शास्त्रीय ज्ञानावर उभारलेली आहे हें आपण पाहातोंच. तेव्हा या शास्त्रीय ज्ञानाचा उदो उदो करणारे अनेक विद्वान् लेखक तेथे असणारच. ते कोठलाहि विषय असो तो शास्त्रांत घोळून लोकापुढे ठेवतात, किंवा शास्त्रीय कोडींच कथानकांसारखीं रंगवितात व सत्य सृष्टीची कादंबरी करून दाखवितात. हेंच वाङ्मय सुपरिणामी होण्यासारखें असेल. केवळ करमणुकीसाठी कला ही नव्हे.

जपानांतील बहुतेक लेखक जपानची राजधानी जी टोकियो तेथे राहातात. ' जपानचे साहित्यिक ' नांवाचें जें सांवत्सरिक निघतें त्यांत नुसत्या टोकियोंतील ६०० प्रसिद्ध लेखकांचीं चरित्रें समाविष्ट आहेत. महाराष्ट्रांतले साहित्यिक पुण्या मुंबईतच जास्त कां या शंकेच्या निरसनाला याने मदत झाली तर पाहावी ! जपानचा आजचा एकच सर्व श्रेष्ठ लेखक सांगावयाचा झाल्यास ' किकुची क्कान ' याचें नांव घ्यावें लागेल.

वाङ्मयांत वृत्तपत्रें आणि नियतकालिकें येतातच. तेव्हा त्याविषयीं सांगावयाचें म्हणजे सुमारे दीड हजार वर्तमानपत्रें व तीनचार हजार नियतकालिकें जपानांत निघतात. पाश्चात्य देशांतल्या प्रमाणे दैनिक पत्रांचा खप लाखाने मोजण्याइतका होतो. वर्तमानपत्रें चालविणाऱ्या संस्था देशोन्नतीच्या अनेक चळवळी करतात. महाराष्ट्रांतील केसरी पत्राने ज्याप्रमाणे टिळक, आगरकर, केळकर, खाडिलकर इ. पहिल्या प्रतीचा लेखकवर्ग तयार केला व उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीला चांगली मदत केली त्याचप्रमाणे जपानमधील ' योमिउरी शिंबुन ' पत्राबद्दल म्हणतां येईल. या पत्राचा वाङ्मयीन दर्जा फार मोठा आहे.

जपानी स्त्रियाहि साहित्यसेवा करण्यांत मागे नाहीत. कित्येक कादंबऱ्या लेखिकांनी संपादिल्या असून कांहीतर अव्वल दर्जाच्या आहेत.

याप्रमाणे आजकालच्या जपानी वाङ्मयाचा थोडक्यांत आढावा घेतला आहे.

चिंतामण गणेश कर्वे

---

# रद्दींतील रत्नें

रत्न १४ शोधक—संपादक.

## पुण्यांतील पाठशाळा

ज्ञानोदय १५–७–१८५३

गेल्या महिन्याच्या २८ तारखेस मंगळवारीं पुण्यांतील पाठशाळेची वार्षिक परीक्षा झाली तेव्हां मोठमोठाले एतद्देशीय लोक पुष्कळ आले होते व कांहीं साहेब लोकहि बरेच आले होते. आणि प्रमुखस्थानीं धारकर पवार राजे बसले होते व त्यानी विद्यार्थ्यांस बक्षिसें द्यावयाचीं तीं स्वहस्ते दिल्हीं. नंतर विद्यार्थ्यांसीं विद्योत्तेजक व त्यांस बोधकारक असें फारच सुंदर भाषण नामदार वार्डीणसाहेब यानी केलें.

---

[ शब्दकोशाच्या संपादकांच्या परवानगीने ]

# मराठी मातृभाषा असणारांची प्रांतवार लोकसंख्या

## ( खानेसुमारी १९३१ )

| प्रदेश | मराठी व कोंकणी |
|---|---|
| हिंदुस्थान | २१३६१३९३ |
| ब्रिटिश मुलुख | १,५३,२८,२९६ |
| संस्थानें व एजन्सीज् | ६०,३३,०९७ |
| १ अजमीर-मेरवाडा | ९४९ |
| २ अंदमान-निकोबार बेटें | ३५२ |
| ३ आसाम | ४,३११ |
| ४ बलुचिस्तान ( ब्रिटिश ) | ८८१ |
| ५ बंगाल | ३,१६० |
| ६ बहार व ओरिसा | १,३०० |
| ७ मुंबई इलाखा ( एडनसह ) | ९५,४२,०८४ |
| एडन | ४०८ |
| ८ ब्रह्मदेश | १,३८४ |
| ९ मध्यप्रांत व वऱ्हाड | ५४,३२,७४७ |
| १० कुर्ग प्रांत | १,९०८ |
| ११ दिल्ली प्रांत | ८५० |
| १२ मद्रास इलाखा | ३,३०,७६९ |
| १३ वायव्य सरहद्दीवरील प्रांत | २६२ |
| १४ पंजाब | ९३५ |
| १५ संयुक्तप्रांत | ४,३९६ |
| १६ आसामांतील संस्थानें | २ |
| १७ बलुचिस्तानांतील संस्थानें | १ |
| १८ बडोदें संस्थान | ३५,८४१ |
| १९ बंगाल्यांतील संस्थानें | १ |
| २० बिहार व ओरिसा यांतील संस्थानें | ४१२ |
| २१ मुंबई इलाख्यांतील संस्थानें | १७,८७,४४१ |
| २२ मध्यहिंदुस्थानांतील एजन्सीज | ५५,००१ |
| २३ मध्यप्रांतांतील संस्थानें | १,८५,२७९ |
| २४ ग्वाल्हेर संस्थान | २१,५३५ |
| २५ हैद्राबाद संस्थान | ३७,८४,८३१ |
| २६ जम्मू आणि काश्मीर संस्थान | २६ |
| २७ मद्रास इलाख्यांतील संस्थानांच्या एजन्सीज | ४८,२७९ |
| कोचीन संस्थान | २७,५६० |
| त्रावणकोर संस्थान | १९,२२९ |
| मद्रास इलाख्यांतील इतर संस्थानें | १,४९० |
| २८ म्हैसूर संस्थान | १,०७,६१७ |
| २९ वायव्य सरहद्दीवरील प्रदेश | १८४ |
| ३० पंजाबांतील संस्थानें | २२ |
| ३१ पंजाब स्टेट्स् एजन्सी | १६ |
| ३२ राजपुताना एजन्सी | २,४४४ |
| ३३ सिकिन संस्थान | ० |
| ३४ संयुक्त प्रांतांतील संस्थानें | १४ |
| ३५ वेस्टर्न इंडिया स्टेट्स् एजन्सी | २,१५१ |

# हिंदुस्थानातील मराठी दुय्यम भाषा म्हणून बोलणारांची संख्या

| मुख्य भाषा व प्रांत | सदर (१) मधील मातृभाषा बोलणारांची एकूण संख्या | सदर (१) मधील मातृभाषा असलेल्यांपैकी मराठी दुय्यम भाषा बोलणारांची संख्या | |
|---|---|---|---|
| | | मराठी | कोंकणी |
| कोरकु-( मध्यप्रांत व वऱ्हाड ) ... | १,६१,९७५ | २,०४४ | ७ |
| तामिळ-( बंगाल, बहार, ओरिसा, मद्रास, हैद्राबाद, कोचिन, त्रावणकोर व म्हैसूर ) ... | २,०१,७७,५९४ | २०७ | १४ |
| मल्याळी-(बंगाल, कुर्ग, मद्रास, त्रावणकोर, कोचीन) | ९१,०१,४४० | ० | २८ |
| कानडी-( बंगाल, मुंबई इ., कुर्ग, मद्रास इ , हैद्राबाद, कोचीन, त्रावणकोर, म्हैसूर ) ... | १,११,९६,१०३ | १,८५,५२१ | १५,४५७ |
| तुलु-( कुर्ग, मद्रास, कोचीन, त्रावणकोर, म्हैसूर )... | ६,२९,४२५ | ११ | ५९ |
| गोंडी-( बंगाल, बहार व ओरिसा, मध्यप्रांत व वऱ्हाड, मध्य हिंदुस्थानातील संस्थानें, हैद्राबाद सं. ) | १७,२०,७९० | ३,२१,३८८ | • |
| तेलगु-( बंगाल, बहार व ओरिसा, मुंबई इ., मध्यप्रांत व वऱ्हाड, मद्रास इ., हैद्राबाद सं., कोचीन, त्रावणकोर, म्हैसूर ) .... | २,६१,७६,४११ | १,४४,१४८ | २ |
| बलुची-( बलुचिस्तान, मुंबई इ., पंजाब ) .... | ६,२५,७०८ | १३ | |
| सिंधी-( बलुचिस्तान, बंगाल इ., मुंबई इ., बडोदें सं. कोचीन, राजपुताना एजन्सी, वेस्टर्न इंडिया स्टेटस एजन्सी ) ... | ३९,६७,०४२ | २,०१३ | |
| कोंकणी-( मुंबई इ., मद्रास इ., कोचीन, त्रावणकोर, म्हैसूर ) ... | ४,६६,३८६ | १३,६०९ | |
| ऊरिया-( बंगाल, बहार, ओरिसा, मध्यप्रांत व वऱ्हाड, मद्रास इ. ) ... | १,०९,२८,७५९ | १०,९१७ | |
| बंगाली-(आसाम, बंगाल, बहार व ओरिसा, कोचीन) | ५,३०,३७,८४१ | १ | |
| पूर्व हिंदी-( बंगाल, बहार व ओरिसा, मध्यप्रांत व वऱ्हाड, सेंट्रल इं. एजन्सी, सिकिम ) ... | ४,१३,६३,४३९ | ३,७६,८०९ | |
| पश्चिम हिंदी-( बलुचिस्तान, मुंबई इ. दिल्ली, मद्रास इ. वायव्य सरहद्दप्रांत, पंजाब, संयुक्तप्रांत, बडोदें सं., सेंट्रल सं. एजन्सी, ग्वाल्हेर सं., हैद्राबाद सं., कोचीन, त्रावणकोर, म्हैसूर, वेस्टर्न इंडिया स्टे. एजन्सी ) ... | ६,३६,२७,०४३ | ३,०८,९४६ | ६,९५३ |

| मुख्य भाषा व प्रांत | सदर (१) मधील मातृभाषा बोलणारांची एकूण संख्या | सदर (१) मधील मातृभाषा असलेल्यांपैकी मराठी दुय्यम भाषा बोलणारांची संख्या | |
|---|---|---|---|
| | | मराठी | कोंकणी |
| राजस्थानी–( बंगाल, मुंबई इ. दिल्ली प्रांत, पंजाब, मध्य हिंदुस्थान एजन्सी, ग्वाल्हेर सं., हैद्राबाद, म्हैसूर, सिकिम ) ... | १,२६,८३,१७३ | ५३,७७१ | |
| गुजराथी–( बंगाल, मुंबई इ., बडोदें सं., सेंट्रल इ. ए. ग्वाल्हेर, हैद्राबाद, कोचीन, राजपुताना एजन्सी, वेस्टर्न इंडिया स्टेट्स एजन्सी )... | १,०६,३३,८६१ | ५०,५६९ | |
| भिल्ली–( मुंबई इ., बडोदें सं., सेंट्रल इ. ए., ग्वाल्हेर सं., हैद्राबाद, राजपुताना एजन्सी ) ... | २१,८५,८७६ | ५७,८४६ | |
| खानदेशी–( मुंबई इलाखा ) ... | २,२२,१६८ | १३,३५३ | |
| पंजाबी–( बंगाल, बहार व ओरिसा, दिल्ली प्रांत, वायव्य सरहद्द प्रांत, पंजाब, जम्मू व काश्मीर, राजपुताना एजन्सी, सिकिम ) ... | १,५७,२५,१९३ | ५४५ | |

## मराठी मातृभाषा असून इतर दुय्यम भाषा म्हणून बोलणारांची संख्या

| भाषा | संख्या | भाषा | संख्या |
|---|---|---|---|
| हिंदुस्थानी | ५,०२,४४६ | राजस्थानी | ५,४७५ |
| कानडी | २,७९,३१० | * कोंकणी | ३,३९३ |
| तेलगु | ६३,५८३ | तामिळ | २,४१७ |
| पश्चिम हिंदी | ५८,३१२ | तुलु | ५२० |
| गुजराथी | ४२,४६६ | पूर्वहिंदी | ८१ |
| खानदेशी | २३,१४४ | बंगाली | ४० |
| गोंडी | २२,८३३ | कोरकु | २४ |
| इंग्रजी | १६,११६ | कच्छी | ९ |
| मल्याळी | ९,८६९ | | |
| उरिया | ९,३४८ | एकूण | १३,३९,२८७ |

* ही मराठींत गणण्यास चिंता नाही. ( संपादक, म. सा. प. ).

# मराठी भाषाक्षेत्र

| | प्रदेश नांव | क्षेत्रफळ चौ. मैल | एकूण लोकसंख्या | मराठी लोकसंख्या | कोंकणी लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| मुं. इ. जिल्हे | अहमदनगर | ६,६११ | ९,८८,२०६ | ८,६९,७९४ | २०४ |
| | नाशिक | ५,८८२ | १०,००,०४८ | ८,६७,४६२ | ५३७ |
| | पुणें | ५,३३२ | ११,६९,७९८ | १०,३५,२५४ | १,८२१ |
| | साता | ५,०५३ | ११,७९,७१२ | ११,११,१०८ | १८६ |
| | सोलापूर | ४,५६९ | ८,७७,५२० | ६,८४,९५७ | २३० |
| | मुंबई उपनगर जिल्हा | १५४ | १,७९,५२४ | १,११,२३२ | ४,२४९ |
| | पूर्व खाननेश | ४,५५१ | १२,०६,०३५ | ९,३४,९९३ | १४६ |
| | पश्चिम खानदेश | ६,४०१ | ७,७१,७९४ | २,०८,३९१ | ४५ |
| | बेळगांव | ४,६१२ | १०,७६,७०१ | २,६८,४०० | ४,८७५ |
| | विज़ापूर | ५,७१० | ८,६९,२२० | २६,८५३ | ६४३ |
| | कुलाबा | २,१६६ | ६,२८,७२१ | ५,९८,९७७ | ६४६ |
| | रत्नागिरी | ३,९८९ | १३,०२,५२७ | १२,४१,३३३ | ८,०४४ |
| | धारवाड | ४,६०६ | ११,०२,९७७ | ४१,९३९ | ४,०७९ |
| | कानडा | ३,९४६ | ४,१७,८३५ | २७,६९५ | १,३०,४१८ |
| | ठाणें | ३,४२२ | ८,३६,६२५ | ७,२६,१३५ | ३,५०७ |
| मुं. इ. संस्थानें | जव्हार | ३१० | ५७,२६१ | ५५,९८५ | |
| | जंजिरा | ३२४ | ९८,२९६ | ८२,५१७ | २,३५७ |
| | भोर | ९२५ | १,४१,५४६ | १,३९,२४६ | ६ |
| | औंध | ५०१ | ७६,५०७ | ६५,४६६ | |
| | फलटण | ३९७ | ५८,७६१ | ५५,६३२ | |
| | अक्कलकोट | ४९८ | ९२,६०५ | २७,७७३ | १ |
| | सावंतवाडी | ९२६ | २,३०,५८९ | २,२०,२४५ | ५,२४२ |
| | कोल्हापूर | ३,२१७ | ९,५७,१३७ | ७,६४,२४६ | ६४२ |
| | कुरुंदवाड ( थोरली पाती ) | १८५ | ४४,२०४ | २१,७७५ | |
| | कुरुंदवाड ( धाकटी पाती ) | ११६ | ३९,५८३ | १८,४९६ | |
| | मिरज ( थोरली पाती ) | ३४३ | ९३,९३८ | ५६,३६७ | ४४ |
| | मिरज ( धाकटी पाती ) | २११ | ४०,६८४ | २१,३३८ | |
| | सांगली | १,१११ | ,५८,४४२ | १,३६,०८४ | ८९ |
| | जत | ९८१ | ९१,०९९ | ४८,४८७ | १ |
| | बांसडा | २१५ | ४८,८३९ | २६,७०९ | |
| | सुरगणें | ३६० | १५,२४५ | १५,०७३ | |

| | प्रदेश नांव | क्षेत्रफळ चौ. मैल | एकूण लोकसंख्या | मराठी लोकसंख्या | कोंकणी लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| मध्यप्रांत | वर्धा | २,४३४ | ५,१६,२६६ | ४,००,१३१ | |
| जिल्हे | नागपूर | ३,८३४ | ९,४०,०४९ | ७,१२,५३३ | |
| | चांदा | ९,३१२ | ७,५९,६९५ | ५,४८,०११ | |
| | भंडारा | ३,६२३ | ८,२४,४९६ | ६,१०,१४० | |
| वऱ्हाड | उमरावती | ४,६९१ | ९,४१,६०४ | ७,२१,५२८ | |
| जिल्हे | अकोला | ४,०९१ | ८,७६,३६२ | ७,०७,५४९ | |
| | बुलढाणा | ३,७६६ | ७,६६,५८४ | ६,४७,०९८ | |
| | यवतमाळ | ५,२१९ | ८,५७,२८८ | ५,९६,१०० | |
| निजाम | औरंगाबाद | ६,२१२ | ९,४४,७९३ | ७,४०,६१४ | |
| जिल्हे | बीड | ४,१३२ | ६,३३,६९० | ५,५२,६४२ | |
| | नांदेड | ३,७७१ | ७,२२,०८१ | ४,५०,६२१ | |
| | परभणी | ५,१२५ | ८,५३,७६० | ७,०८,७२० | |
| | गुलबुर्गा | ६,९७५ | १२,२५,००८ | १,९८,९५० | |
| | उस्मानाबाद | ३,५२६ | ६,९१,०६८ | ५,४६,७४९ | |
| | बेदर | ४,८२५ | ८,७३,६१५ | ३,२७,५३८ | |

---

# रद्दींतील रत्नें

रत्न १५ शोधक—संपादक

## बाळाराम गणपत

ज्ञानोदय १–९–५३

सन १८५२ आगस्त १६ वे तारखेस बाळाराम गणपत शेणवी याने रेवरेंड प्रैस साहेबापासून बाप्तिस्मा घेतला. आणि एक वर्ष तीन दिवस त्या धर्मांत राहून नंतर जुंमामसीदींत जाऊन महंमदी धर्म स्वीकारला व त्याला काजीपासून अबदुल करीम कासीम असें नांव प्राप्त झालें. पुढें त्यांत दोन चार दिवस झाले नाहींत तों त्याचाहि खेद पावून रडूं लागला आणि विष खाल्लें व त्याचाहि त्यास बराच खेद झाला आणि बरें व्हावें म्हणून हास्पितलांत नेले व उपाय झाले तरी ते व्यर्थ होऊन शेवटीं तो मरण पावला, असा त्या बिचाऱ्याचा परिणाम झाला.

---

# व्याकरण समिति

## श्री. अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य सम्मेलन, अधिवेशन १९ वें बडोदें, यांसा

वि. वि०— कोल्हापूर येथे झालेल्या महाराष्ट्र-साहित्य-सम्मेलनाने पुढील ठराव सर्वानुमतें मंजूर केला होता—

' पुढील गृहस्थांच्या व्याकरण समितीने प्रचलित व्याकरणांतील मतभेदांचे प्रश्न विचारांत घेऊन त्या बाबतींत व समितीपुढे येणाऱ्या अन्य बाबतींत आपला साधार निर्णय अेक वर्षाच्या आंत प्रसिद्ध करावा व पुढील सम्मेलनाने त्याचा विचार करावा. ( १ ) य. रा. दाते, ( २ ) कृ. पां. कुलकर्णी, ( ३ ) गो. पां. पावशे, ( ४ ) ना. गो. चापेकर, (५) वा. कृ. भावे, ( ६ ) रा. दा. देसाई, ( ७ ) दि. धों. परांजपे.

या ठरावाप्रमाणे समितीची प्रास्ताविक सभा ता. ३०।१२।३२ रोजीं होऊन वादग्रस्त प्रश्नांबद्दल सूचना मागवाव्या असें ठरलें. त्याप्रमाणे अनेक नियतकालिकांतून व्याकरण समितीचें पहिलें पत्रक प्रसिद्ध करण्यांत आलें; व शिवाय सर्व कॉलेजांतील मराठीचे प्रोफेसर आणि या विषयाचे अभ्यासक यांजकडेहि पत्रक पाठविण्यांत आलें. नंतर त्या पत्रकाप्रमाणे आलेल्या सूचना विचारांत घेऊन व वादग्रस्त प्रश्नांबद्दल दोन दिवस चर्चा करून (पुणें येथील ता० ७।८ मे १९३३ च्या सभेंत ) प्रश्नावली तयार करण्यांत आली, व ती नियतकालिकांकडे पाठविण्यांत आली. परंतु पुढे पुणे येथे प्लेग सुरू झाल्यामुळे कांहीं महिने समितीचें काम बाजूस ठेवावें लागलें. पुढे ता. २५-१२-३३ रोजीं नागपूर येथे झालेल्या सभेंत कामाचा अहवाल तयार करण्यांत आला. तो नागपूर येथील सम्मेलनापुढे मांडण्यांत येऊन अेक वर्षाची मुदत मागण्यांत आली. ती सम्मेलनाने दिल्यामुळे पुढे समितीने आपलें काम चालू ठेविलें. व पूर्वीची प्रश्नावलि प्रसिद्धीसाठी पुन्हा पाठविण्यांत आली. ती अनेक नियतकालिकांत प्रसिद्ध झाल्यामुळे समितीकडे अनेक विद्वानांकडून सूचना आल्या. त्या विचारांत घेऊन निर्णय करण्यासाठी पुणें येथे ता० ३०।११ व १।१२।३४, बदलापूर येथे ता० २२।२३ डिसें. १९३४ व बडोदें येथे ता० २४।१२।३४ रात्रीं आणि २५।१२।३४ सकाळीं अशा बैठका झाल्या.

ता० ३०।११ व १।१२।३४ च्या सभेला श्री. ना. वि. आपटे व श्री. गो. कृ. मोडक यांनी उपस्थित राहून चर्चेच्या कामीं जी मदत केली तीबद्दल समिति त्यांची आभारी आहे. तसेंच सातारा येथे श्री. सुपेकरशास्त्री, श्री. गद्रे, श्री. नवाथे. श्री. फणसळकर आणि आमच्या समितीपैकी श्री. कुलकर्णी व श्री. पावशे यांनी एक सभा भरवून प्रश्नावलींतील प्रश्नांची चर्चा करून त्या सभत ठरलेले निर्णय या समितीकडे पाठविले, याबद्दल, त्याचप्रमाणे अनेक विद्वानांनी समितीकडे सूचना पाठवून मदत केली याबद्दल; समिति त्यांची आभारी आहे.

आमच्या समितीच्या सभांतून ठरलेले निर्णय सोबत आहेत. हे निर्णय अंतिम किंवा कायमच्या स्वरूपाचे नसून त्यांवर यापेक्षा अधिक व अनेक बाजूंनी चर्चा झाली पाहिजे, असें

समितीच्या सर्व सभासदांचें मत आहे. व्याकरणासारख्या विषयावर जितकी विस्तृत व अनेक बाजूंनी चर्चा होईल, तितकी ती समितीच्या निर्णयांस बहुजनसमाजाची मान्यता मिळण्यास अधिक उपकारक होईल. याकरितां याच समितीने आपले हे निर्णय प्रसिद्ध करून व त्यांवर निरानिराळ्या विद्वान लोकांकडून मतें मागवून व चर्चा करून आपले निर्णय कायमच्या स्वरूपांत पुढील सम्मेलनास सादर करावे अशी सम्मेलनास शिफारस करण्याबद्दल आपणास विनंती आहे. ता० २५।१२।३४

नारायण गोविंद चापेकर
यशवंत रामकृष्ण दाते
गोविंद पांडुरंग पावशे
दिनकर धोंडो परांजपे
कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी
वासुदेव कृष्ण भावे
राजाराम दामोदर देसाई

**टीप—** संयुक्त क्रियापदें मानावीं किंवा नाहीं यासंबंधी अधिक चर्चा करून त्यानंतर काय तो निर्णय समितीने करावा असें मला वाटतें. सध्याचें माझें मत संयुक्त क्रियापदें मानूं नयेत असें आहे. हीच गोष्ट आख्यानांची वाक्यपृथक्करणामुळे मराठी व्याकरणांत निष्कारण घोटाळा माजत असल्याने व त्याची आवश्यकता नसल्याने त्याचा मराठी व्याकरणांत अंतर्भाव करूं नये असें माझें मत आहे. प्रथम, द्वितीय, तृतीय या संज्ञाऐवजीं उत्तम, मध्यम, प्रथम ( अन्य ) अशा संज्ञा वापराव्या. हिंदी व्याकरणांत अशाच आहेत. संस्कृतांत याच आहेत.

रा. दा. देसाई.

## मराठी व्याकरणांतील वादग्रस्त प्रश्नांविषयीच्या

# निर्णयांचा मसुदा

### प्रास्ताविक

मराठी व्याकरणांतील कांही वादग्रस्त प्रश्न असे आहेत की, त्यांचा निकाल सर्वांच्या मतांचें पूर्ण खंडन-मंडन करून करणें जवळ जवळ अशक्य आहे. परंतु सर्व गोष्टींचा विचार करून, भाषेच्या अभिवृद्धीला व प्रवृत्तीला एकंदरींत पोषक होतील अशा धोरणाने, जितकी शास्त्रशुद्धता साधतां येईल, तितकी साधण्याचा प्रयत्न करून प्रस्तुत निर्णय आम्हीं दिले आहेत.

आहे त्यामध्ये बदल करावयाचा नाहीं असें धोरण ठेवून कोणत्याच गोष्टीची सुधारणा होणार नाहीं हें जसें खरें आहे, त्याचप्रमाणे शक्य तोवर बदल न करितां भागण्यासारखें असेल तर तो न करणेंच अधिक इष्ट होय असें आम्हांस वाटतें.

### रचनापद्धति

मराठी ही स्वतंत्र भाषा असल्यामुळे तिच्या व्याकरणाची रचनापद्धति तिचा स्वभाव लक्षांत घेऊन करणें अवश्य असल्याने, ती कोणत्याच भाषेच्या व्याकरणाला पूर्णांशाने अनु-

सरून होणार नाही. परंतु मराठी भाषेची परंपरा ही संस्कृत प्राकृत अपभ्रंशादि भाषांस विशेष अनुसरून असल्याने त्या भाषांच्या व्याकरणाचें भरपूर साहाय्य घेऊन मराठीचें व्याकरण ठरवावें. तसेंच परभाषांतील ज्या गोष्टींचें अनुकरण मराठीने केलेलें आहे, त्या गोष्टी अनिष्ट नसतील तर, त्यांचा समावेशहि 'मराठी व्याकरणांत' करण्यास हरकत नाही.

## वर्णविचार

**स्वरांची संख्या**— यांमध्ये निर्विवाद स्वर म्हणजे अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ आहेत. बाकी राहिलेल्यांचा विचार करूं.

दीर्घ ॡ हा स्वर मराठींत नाही आणि संस्कृतांतहि नाही. म्हणून तो गाळावा.

ऱ्हस्व ऋ मराठींत आहेच. ऱ्हस्व ऌ संस्कृतांत आहे. मराठींत तो फक्त तत्सम शब्दांत येतो की तद्भव शब्दांत येतो एवढाच प्रश्न. परंतु तो कोणत्याहि शब्दांत आला तरी त्याचें अस्तित्व आहेच.

दीर्घ ॠ मराठींत येत नसल्यामुळे तो गाळण्याचा प्रश्न उत्पन्न होतो. परंतु संस्कृतांतील वर्णांपैकी ऋ विना बाकी सर्व वर्ण मराठींत आलेले असल्यामुळे व मराठीमधील संधिविचार प्रायः संस्कृताप्रमाणे असल्यामुळे पितृ + ऋण अशा सारख्या संस्कृत उदाहरणांत त्याची आवश्यकता उत्पन्न होते. म्हणून दीर्घ 'ॠ' मराठींतून गाळूं नये असें आम्हांस वाटतें.

अं, अः— अनुस्वार आणि विसर्ग यांना 'अ' स्वर जोडून अं अः हे झालेले आहेत. यांना जरी स्वरांच्या संख्येंत दाखल केलेलें असलें तरी त्यांना अनुस्वार आणि विसर्ग अशीं नांवें आहेत. अर्थात् उपयोगाच्या दृष्टीने वाद नसून त्यांना स्वरांच्या यादींत घालावें की नाही व स्वरांमध्ये घालावयाचें नसल्यास कोठें घालावें हाच मुख्यतः वादाचा प्रश्न आहे.

अनुस्वार आणि विसर्ग हे स्वर नाहीत. कारण (१) त्यांचा उच्चार स्वतंत्रपणें करितां येत नाही; (२) स्वर व्यंजनाला जोडून आले म्हणजे अक्षर तयार होतें, पण अनुस्वार आणि विसर्ग हे व्यंजनाला जोडून आले तरी अक्षर बनत नाही.

अनुस्वार आणि विसर्ग हीं व्यंजनेंहि नाहीत. कारण (१) व्यंजनाला स्वर जोडून अक्षर बनलें तरी वाचतांना आपण प्रथम व्यंजनांचा उचार करितों. परंतु अनुस्वाराचा उच्चार स्वरानंतर होतो. (२) जोडाक्षरांमध्ये दोन व्यंजनें यावीं लागतात. पण अनुस्वार वा विसर्ग दोन व्यंजनांपैकी एका ठिकाणीं येऊन चालत नाही.

आता अनुस्वार किंवा विसर्ग पुढे आला असतां त्यामुळे जोडाक्षराप्रमाणे वृत्तांमध्ये मागील स्वरास गुरुत्व येतें हें खरें; तथापि तेवढ्यावरून अनुस्वार व विसर्ग यांचें व्यंजनत्व सिद्ध होत नाही. म्हणून त्यांचा समावेश स्वर किंवा व्यंजनें यांमध्ये न करितां त्यांचा स्वतंत्र वर्ग करून त्यास **स्वरादि** असें कै. दामले यांनी दिलेलें नांव द्यावें असें आम्हांस वाटतें.

एतावता अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ हे **स्वर** आणि ं अनुस्वार व ः विसर्ग हे **स्वरादि** समजावे.

ं, ः यांचें स्थान— स्वरादींचें स्थान स्वरानंतर व व्यंजनांपूर्वी म्हणजे सध्यांचें आहे तेथेच ठेवणें युक्त आहे.

४१०

**लेखन—** मुलांस प्रारंभीं शिकवितांना थोडी अशास्त्रीयता स्वीकारून अनुस्वार आणि विसर्ग अं अः असे 'अ' स्वरादि लिहिण्यावाचण्यास सांगण्यास हरकत नाही. पण त्याच-वेळीं अनुस्वार आणि विसर्ग हे निरनिराळ्या वर्णांना जोडून येतात हेंहि मुलांच्या नजरेस आणावें. शास्त्रीय विवेचनांत त्यांचें लेखन ं, ः अशा स्वरूपामध्ये करणें युक्त होईल.

**व्यंजनांची संख्या—** व्यंजनांच्या संख्येंत वादग्रस्त ङ्, ञ्, क्ष्, ज्ञ् हीं चार होत.

अनुनासिकांपैकी ण्, न्, म् यांचा उपयोग स्वतंत्रपणें शब्दांत होतो. तसा ङ्, ञ् यांचा होत नाही. परंतु त्यांचा उपयोग संस्कृत तत्सम शब्दांत होतो. उदा० वाङ्मय, पराङ्-मुख. ञ् अनुनासिकाचा उच्चार मराठींत करण्याची प्रायः रूढी नाही. परंतु कांचन, तंजावर, जंजाळ अशा शब्दांतून तो स्पष्टपणें दिसतो. म्हणून ङ्, ञ् यांना व्यंजनाच्या संख्येंतून गाळ-ण्याची आवश्यकता वाटत नाही.

क्ष्, ज्ञ् यांची गणना सध्या व्यंजनामध्ये होत असली तरी तीं जोडव्यंजनें असल्याने तीं व्यंजनांच्या संख्येंतून गाळावीं.

**अंतःस्थांचा क्रम य्, र्, ल्, व् असा असावा किंवा य्, व्, र्, ल् असा असावा?** इ, उ, ऋ, लृ यांस होणारे आदेश अनुक्रमे य्, व्, र, ल् असे आहेत. उलट य्, व्, र्, ल् यांचें संप्रसारण इ, उ, ऋ, लृ असें होतें. या दृष्टीने य्, व्, र्, ल् असा क्रम रूढ करणें सकृद्दर्शनी आवश्यक वाटतें. उलट य्, व्, र्, ल् असा अंतःस्थांचा क्रम बदलण्याऐवजी सध्या असलेला स्वरांचा क्रम इ, ऋ, लृ, उ असा बदलण्यानेहि उपरिनिर्दिष्ट अडचण दूर होईल हें खरें. पण त्यायोगे पुष्कळ ठिकाणीं फेरफार करावा लागेल. म्हणून अंतःस्थांचा क्रम बदला-वयाचा तर तो य्, व्, र्, ल् असा बदलणें इष्ट होईल.

परंतु वर्णमालेंत अंतःस्थांचा असलेला क्रम स्थानभेदाने ठरलेला दिसतो. व्यंजनांपुरता विचार केल्यास क वर्ग कंठ्य, च वर्ग तालव्य, ट वर्ग मूर्धन्य, त वर्ग दंत्य, प वर्ग ओष्ठय असा स्थानक्रम आहे. याच क्रमानुसार य्, र्, ल्, व् हा अंतःस्थांचा क्रम लाविलेला आहे. य् तालव्य, र् मूर्धन्य, ल् दंत्य आणि व् दंतौष्ठ्यं अशीं स्थानें असल्याने क्रम एका तत्त्वाने केलेला दिसतो. पुढची रचना पाहिल्यासहि श् तालव्य, ष् मूर्धन्य, स् दंत्य बरोबरच आहे. ळ् मराठी म्हणून शेवटीं देणें युक्त. ह् चा संबंध स् शीं अधिक म्हणून तो स् नंतर आला असावा.

कंठ्य, तालव्य, मूर्धन्य, दंत्य, ओष्ठ्य हा स्थानक्रम बरोबर नसून वास्तविक क वर्ग, ट वर्ग, च वर्ग, त वर्ग आणि प वर्ग अशी व्यवस्था पाहिजे असा एक प्रश्न आहे. या दृष्टीने स्वरांचा क्रम अ, आ, ऋ, ॠ, इ, ई, लृ, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ व व्यंजनांचा क्रम क, ट, च, त, प असे वर्ग र्, य्, ल्, व्, ह्, ष्, श्, स्, ळ् असा लागतो. यांमध्ये ह् चें स्थान प वर्गानंतर किंवा सध्याप्रमाणे स् पुढें येण्यासहि प्रत्यवाय नाही.

क्रम बदलल्यास तो कसा लागेल हें पाहिलें. तरी क वर्गानंतर च वर्गास स्थान का दिलें गेलें याचाहि विचार करणें अवश्य आहे. द्राविडी भाषांतून ट् वर्ग मागाहून घेतला गेला असें मानलें तरी त्याला च वर्गानंतरचें स्थान का दिलें गेलें असा प्रश्न उत्पन्न होतो. मुखांतील स्थानांचा क्रम कोणता हाहि वादग्रस्त प्रश्न आहे. जिभेचें टोक आंतून बाहेर ज्या क्रमाने लागतें

त्या क्रमाने कंठ, ताल्कु, मूर्धा...इत्यादि क्रम आहे असें कांहींचें म्हणणें आहे. उच्चाराच्या वेळीं जेथून वायु निघतो तें त्याचें स्थान या दृष्टीने विद्यमान क्रम बरोबर आहे असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु प्रातिशाख्यामध्ये कंठ्य, मूर्धन्य, तालु, दंत्य, ओष्ठ्य असा क्रम नमूद असून 'ळ्' इत्यादींचा उच्चार स्पष्ट केल्यास तो क्रम बरोबर दिसतो. तथापि सध्याच्या क्रमामध्ये बदल करण्यापासून व्यवहारदृष्ट्या फायद्यापेक्षा अडचणी अधिक उत्पन्न होण्याचा संभव असल्याने आज वर्णांच्या क्रमांत बदल करावा असें आम्हांला वाटत नाही.

## शब्दांचें वर्गीकरण




टीपः– विभक्ति हा शब्द संस्कृतामध्ये सर्व सव्यय शब्दांच्या प्रत्ययांना लावितात. मराठींत तो धातूंच्या प्रत्ययांवांचून अन्य सव्ययांच्या प्रत्ययांना लावितात. याच अर्थी सविभक्तिक हा शब्द योजिला आहे. धातूंव्यतिरिक्त सव्यय शब्दांना प्रातिपदिकें असें कांही वैयाकरणांनी म्हटलें आहे. 'विभक्ति' शब्दाप्रमाणेच प्रातिपदिक हा शब्द मराठींत वरील अर्थाने रूढ करण्यास हरकत नाही.

## नामांचें वर्गीकरण




रूपसिद्धीच्या दृष्टीने नामांचे पोटप्रकार पाडतां येत नाहीत. परंतु नामांच्या पोटप्रकारांची रूपसिद्धीच्या दृष्टीने आवश्यकता नसली तरी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने त्यांची आवश्यकता आहे असें आम्हांस वाटतें. वर्गीकरण करितांना 'रूपसिद्धि व अर्थ हें अेकच भेदक तत्व

लावणें इष्ट आहे' हें लक्षांत घेऊन शक्य तितकें शास्त्रशुद्ध वर्गीकरण करण्याचा आम्ही प्रयत्न केला आहे.

## सर्वनामें

सर्वप्रकारच्या नामांकरिता ज्या शब्दांचा उपयोग करितां येतो व ज्यांत वाक्यांत त्या नामांचा अर्थ प्राप्त होतो त्या शब्दांस सर्वनामें म्हणावें अशासारखी सर्वनामाची व्याख्या स्वीकारावी.

नामें व सर्वनामें यांनी प्रथम, द्वितीय व तृतीय यांपैकी कोणतातरी पुरुष दर्शविला जातो. त्यांपैकी मी–आम्ही (कधी कधी आपण, स्वतः) यांनी प्रथम पुरुष, तूं–तुम्ही (कधी कधी आपण, स्वतः) यांनी द्वितीय पुरुष आणि बाकी सगळीं नामें व सर्वनामें यांनी तृतीय पुरुष दर्शविला जातो.

पुरुष हें भेदक तत्त्व मानून सर्वनामांचे प्रकार करावयाचे तर (१) प्रथमपुरुषवाचक सर्वनामें (२) द्वितीयपुरुषवाचक सर्वनामें व (३) तृतीयपुरुषवाचक सर्वनामें असे प्रकार करावे लागतील. अर्थाच्या दृष्टीने अधिक प्रकार करावयाचे तर ते तृतीयपुरुषवाचकांचे होतील. परंतु सर्वनामें हीं तृतीयपुरुषवाचकच असल्याने प्रथमपुरुषवाचक व द्वितीयपुरुषवाचक सर्वनामें एवढींच सर्वनामें पुरुषवाचक समजून बाकीच्यांचे दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक व सामान्य असे प्रकार करावे.

मी, तूं, तो, हा, जो, कोण, कोणी, आपण, स्वतः हीं सर्वनामें होत. 'असें' हें विशेषण सर्वनाम बनलें आहे. पुढील वाक्य मागील वाक्यांत कर्म असेल, तेव्हा मागील वाक्यांत प्रयोग सांगतांना 'असें' हा शब्द घालण्याची रूढी आहे. म्हणून असें हेंहि सर्वनाम मानावें असें आम्हांला वाटतें.

सर्वनामांचे प्रकार—

(१) पुरुषवाचक— मी– आम्ही.
तूं– तुम्ही'
आपण, स्वतः (कधी कधी)

(२) दर्शक— तो, ती, तें– ते, त्या. तीं.
हा, ही, हें– हे, ह्या, हीं.
असें.

(३) संबंधी— जो, जी, जें– जे, ज्या, जीं,

(४) प्रश्नार्थक— कोण, काय.

(५) सामान्य— कोण, कोणी, काय, आपण, स्वतः

**सार्वनामिक विशेषण वाद्**— मराठीची प्रवृत्तीच अशी आहे की, आधिक्य दाखविण्यासाठी एका शब्दाचा दोनदा उच्चार करितात. त्याचप्रमाणे निर्देश स्पष्ट होण्यासाठी

नामापाठीमागे नाम किंवा सर्वनाम घालण्याची रूढी आहे. तसेंच नामामागे नाम घातलें असतां मागल्या नामाची जात नामाऐवजीं विशेषण असें सांगण्याची रूढी नाही. शिवाजी महाराज 'अकबर बादशहा' असें म्हटलें असतां अकबर व बादशहा या दोन शब्दांपैकी ऐकाची जात नाम अस कांही सांगितलें जात नाही. 'रामा घरीं नव्हता' आणि 'रामा तेथे नव्हता' यांपैकी पहिल्या वाक्यांत 'घरीं' ही अधिकरणार्थी सप्तमी, 'तेथे' प्रमाणे स्थल वाचक क्रिया विशेषण म्हणून सांगितलें जात नाही. याच न्यायाने नामामागें सर्वनाम दिसलें. ( उदा०— हा मनुष्य ) तर त्या सर्वनामाला विशेषण म्हणण्याची आवश्यकता आहे असें आम्हांला वाटत नाही.

सर्वनामांवरून बनलेलीं जीं विशेषणें ( उदा०— जसा, तसा, कोणता. ) तीं सार्वनामिक विशेषणें' होत.

## विशेषण

पदार्थाचा गुण किंवा प्रमाण दाखविणारा जो शब्द त्याला विशेषण म्हणावें.

विशेषणांचे प्रकार दोन— ( १ ) गुणविशेषणें व ( २ ) संख्याविशेषणें.

'विधिविशेषणें' हा स्थान भेदाने होणारा प्रकार अवश्य तर सांगावा. परंतु त्याचा समावेश वरील प्रकारांतच होतो.

विशेषणें हीं नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, अव्यय या सर्वांचे गुण दर्शविण्यासाठी येतात. म्हणजे विशेषणाचें विशेष्य हें सर्व जातींत असूं शकतें. अर्थात् त्या दृष्टीने विशेषणाचे अनेक प्रकार होतील. परंतु तितके करण्याची आवश्यकता दिसत नाही.

## संयुक्तक्रियापदें

जेव्हा एकच क्रिया दोन धातुसाधित शब्दांनी व्यक्त होते तेव्हा त्या ठिकाणीं संयुक्त क्रियापद मानावें. अस, नस, जा. . . इत्यादि धातूंच्या मागे धातुसाधित शब्द असतां एकाच क्रियेसंबंधाने विधान असतें. म्हणून तेथे तीं संयुक्त क्रियापदें मानावीं. त्याचप्रमाणे 'पैसे देऊन टाक' अशा सारख्या वाक्यांत 'देणे' क्रियेला प्राधान्य असून टाक शब्द आधिक्यासाठी किंवा पूर्ततेसाठी आला आहे. म्हणून अशा ठिकाणीं ( 'देऊन टाक' एवढें ) संयुक्त क्रियापद मानावें. परंतु मी 'जेऊन आलों' या वाक्यांत जेवणें व येणें या दोन क्रिया स्वतंत्र आहेत म्हणून 'जेवून आलों' हें संयुक्त क्रियापद नव्हे.

## विभक्तिविचार

ज्याच्या योगाने प्रादिपदिकाचा पदशब्द होतो त्या प्रत्ययाला (व प्रत्ययुक्त शब्दालाहि) विभक्ति म्हणतात. अर्थात् रूपावरून विभक्त्या मानाव्या. प्रथमा, तृतीया, पंचमी, सप्तमी, संबोधन या विभक्त्यांच्या रूपांबद्दल वाद नाही. ज्या अर्थी विभक्ति ठरविण्यासाठीं प्रातिपदिकांचें वाक्यगत रूप पाहावयाचें किंवा विभक्ति म्हणजे प्रत्यय त्या अर्थी द्वितीया व चतुर्थी या दोन विभक्त्यांचीं रूपें सारखीं असल्यामुळे त्यांपैकीं एक विभक्ति गाळणें अवश्य आहे. अेक विभक्ति गाळणाऱ्या वैयाकरणांनी द्वितीया गाळलेली आहे. गाळली तर चतुर्थी गाळावी असें कांहींनी म्हटलेलें आहे.

गाळली तर चतुर्थी गाळावी हें अधिक इष्ट दिसतें. परंतु गाळणाऱ्या वैयाकरणांनी द्वितीया गाळलेली असल्याने अेक विभक्ति गाळावयाची झाल्यास द्वितीया गाळणें युक्त होईल. परंतु ही सूचना मान्य होण्यासारखी नसेल तर निदान अप्रत्यय द्वितीया गाळून (कारण रूपावरून विभक्तिविचार केल्यावर अप्रत्यय द्वितीयेचीं रूपें प्रथमेचीं होत हें स्पष्ट आहे.) सध्याप्रमाणे द्वितीया व चतुर्थी मानाव्या. ' रामा आंबा खातो ' अशासारख्या वाक्यांत आंबा शब्दाची विभक्ति प्रथमा असून तिचा अर्थ कर्म आहे असें म्हणावें.

षष्ठीच्या प्रत्ययाचीं रूपें लिंगवचनाप्रमाणे बदलतात; परंतु तेवढ्यावरून षष्ठ्यंतरूपें विभक्तिरूपें नव्हेत असें म्हणतां येत नाही. कारण षष्ठीचे प्रत्यय लागण्यापूर्वी सविभक्तिकांचें सामान्य रूप होतें. त्याचप्रमाणे कधी कधी षष्ठीचा संबंध क्रियापदाशींहि असतो.

## आख्यातव्यवस्था

नामादिकांना होणारा विकार म्हणजे विभक्ति. त्याचप्रमाणे धातूंना होणारा विकार म्हणजे आख्यात होय. प्रायः समानार्थक विभक्तिरूपांचे गट करून त्यांना प्रथमादि क्रमवाचक अर्थहीन नांवें दिलीं त्याचप्रमाणे आख्यात रूपांचे समानार्थक गट करून त्यांना विभक्त्याप्रमाणे नांवें देणें युक्त दिसते. अर्थ विचारांत घेऊन ज्याप्रमाणे कारकार्थांची योजना केलेली आहे त्याचप्रमाणे काळ व अर्थ सांगण्याची योजना आख्यातांच्या बाबतींत करावी असें म्हणणारा अेक पक्ष आहे. तात्त्विक दृष्ट्या ही विचारसरणी कोणालाहि मान्य होण्यासारखी आहे. प्रायः लाख्यातार्ची रूपें भूतकाळ दर्शवितात, ताख्यातार्ची वर्तमानकाळ दर्शवितात, वारक्यातार्ची विध्यर्थ दर्शवितात....... वगैरे म्हणून लाख्याताला भूतकाळ, ताखाताला वर्तमानकाळ, वाख्याताला विध्यर्थ,...... अशीं नांवें दिलीं जातात. यामुळे कधी कधी रूपावरून मानला जाणारा काळ व प्रत्यक्ष काळ यांमध्ये फरक आढळतो. ही अडचण दूर होण्यासाठी प्रत्यक्ष असणारा काळ सांगावा, आणि रूपासाठी अवश्य तर कोणता प्रत्यय लागलेला आहे, तें सांगावें. विभक्तीप्रमाणे आख्यात प्रत्ययांना क्रमवाचक नांवें देऊन व्यवस्था करण्याने विभक्तीपेक्षांहि अधिक वादग्रस्त प्रश्न उत्पन्न होणारे असल्याने तशी व्यवस्था करणें सोईचें होणार नाही असें आम्हांस वाटतें.

## वाक्यपृथक्करण

मराठी भाषा ही विभाक्तिप्रचुर असल्यामुळे वाक्याचा अर्थबोध होण्यास अडचण पडत नाही हें खरें असलें तरी वाक्यांतील प्रत्येक शब्दांचें व्याकरण करणें आणि वाक्यपृथक्करण हीं अेकमेकांस पूरक आहेत. म्हणून वाक्यपृथक्करण हा भाग मराठींत ठेवणेस हरकत नाही.

रत्न १६ शोधक—संपादक

## किरकोळ बातम्या

ज्ञानोदय १५–७–५७

थोड्या दिवसांमागें बंगाल्यांतील कोणी एक हिंदू ब्रम्ही देशांत रणगूण एथें जाऊन आला म्हणून त्यास जातीनें अपांक्त ठेविलें आहे.

*    *    *    *

ज्ञानोदय १५–७–५३

हल्लीं एथें जसे शाक्त व बाकीचे ब्राह्मण ह्यांचे दोन पक्ष झाले आहेत, तसेंच आणखी त्या ब्राह्मणांत दोन फळ्या होतील असा संभव होत आहे. नारायणशास्त्री अभ्यंकर व गोपाळशास्त्री गोखले, जे पाठशाळेंत सर्व जातींच्या लोकांस संस्कृत शिकवूं लागले आहेत त्यांस बहिष्कार घालणार व त्याकरितां गांवांत याद फिरत आहे, असें आम्ही एका विश्वासू गृहस्थाकडून ऐकलें. आतां हें भटांचें बंड किती दिवस माजेल ह्याचा अदमास होत आहेच. आम्हांस तर असें वाटतें कीं, असीं भिकार ग्रामण्यें करून कृष्णंभट्टासारिखें ढोंग माजविणें ह्यांत कांहीं हांसील नाहीं. आतां इतकेंच कीं, जसी वर लिहिलेल्या उभय शास्त्र्यांनीं पोटावर नजर देऊन ही शिकविण्याची सोय पतकरली तसीं इतर शास्त्र्यांस पोटें भरलीं पाहिजेत, म्हणून त्यानी हा उपाय योजिला आहे. बाकी स्वधर्मावर आमच्या लोकांची कितपत निष्ठा आहे व त्याच्या रक्षणाकरतां किती मनापासून झटतात हें आम्ही नेहमीं उघडरीतीनें पाहतों.

*    *    *    *    *

ज्ञानोदय १–३–१८५३

अमेरिका देशांत न्युयार्क शहरामध्यें अरिस्कन नामें एका आगबोटीचें काम चाललें होतें तीं हल्लीं तयार झाली. ही चांगली चालेल किंवा न चालेल असा लोकांला संशय होता, परंतु खासी चालती.

दुसऱ्या आगबोटी ज्या मुंबईस येतात त्या वाफेनें चालतात पण ही नुसत्या गरम वाऱ्याच्या योगाने चालती. ही आगबोट कित्येक प्रकारानें चांगली आहे कीं यंत्राचा खटाटोप स्वल्प आहे व फुटण्याचें भय नाहीं आणि कोळशे वगैरे थोडे लागतात. शिवाय वाईट वास व मळकट पदार्थ हे ईत फार नसतात. तर यावरून वाफेच्या आगबोटी माजी पडून याच प्रकारच्या लोक करतील असें समजदार म्हणूं लागले. आणि ह्या आगबोटीचें जहाज तरी फार उत्कृष्ठ आहे.

---

# ग्रंथपरीक्षण



'कार्लमार्क्स' :— गेल्या पंधरावीस वर्षांत जगांतील आर्थिक परिस्थितींत इतके महत्त्वाचे फरक पडले आहेत आणि आज जागतिक आर्थिक व्यवस्था इतकी अस्थिर झाली आहे की, आर्थिक पुनर्घटनेचा विचार हाच आज विशेष महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. या पुनर्घटनेच्या विचारांत समाजसत्तावाद्यांचा पक्ष सर्वांत प्रबल आहे. तेव्हा या पक्षाची खरी स्थापना आधुनिक युगांत ज्याने केली व ज्याचे ग्रंथ या पंथांतील बहुतेक पक्षोपपक्ष प्रमाणभूत मानतात, त्या महान् पुरुषाच्या चरित्राची व शिकवणीची माहिती सामान्य जनतेस करून देणें अत्यंत आवश्यक आहे. रा. भुस्कुटे यांच्या नवीन पुस्तकामुळे हें कार्य आता महाराष्ट्रांत बरेंच सुकर झालें आहे यांत शंका नाही.

असें पुस्तक लिहिण्याचे दोन प्रकार संभवतात. एकतर बरींच पुस्तकें वाचून त्यांतील माहिती मराठी वाचकांस पटेल अशा रीतीने मांडणें अथवा एखाद्या चांगल्या परभाषीय पुस्तकाचें सरळ भाषांतर करणें. परन्तु रा. भुस्कुटे यांनी यांपैकी कोणताच मार्ग पत्करलेला नाही. लेखकाने प्रस्तावनेंत दर्शविल्याप्रमाणे हा ग्रंथ मुख्यतः तीन चार इंग्रजी ग्रंथांची मदत घेऊन लिहिला आहे. या पुस्तकाचा पहिला भाग आम्ही Beer च्या पुस्तकाशीं ताडून पाहिला तेव्हा त्यांतील बहुतेक प्रकरणें कांही अवांतर पुस्तीवजा मजकूर सोडल्यास Beer च्या पुस्तकांतील प्रकरणांवरून भाषांतरित आहेत असें आढळलें. कोणत्याच एका पुस्तकाचें भाषांतर न केल्यामुळे मूळ पुस्तकांतील विशिष्ट गुण या ग्रंथांत उतरलेले नाहीत. पण उलट स्वतंत्र ग्रंथरचनेचा प्रयत्न न झाल्यामुळे पुस्तकाची मांडणी मराठी वाचकास पटेल अशा तऱ्हेची झालेली नाही. उदाहरणार्थ, गेल्या शतकांतील युरोपीय, राजकीय व आर्थिक परिस्थितीची थोडीबहुत तरी कल्पना इंग्रजी वाचकास असते. सामान्य मराठी वाचकास तशी बिलकूल नसते. पण ही गोष्ट रा. भुस्कुटे यांस पुस्तक लिहिण्याच्या त्यांच्या विवक्षित पद्धतीमुळे जमेस धरतां आलेली दिसत नाही.

ग्रंथाचे दोन भाग केलेले आहेत. पहिला भाग चरित्र व दुसरा भाग शिकवण असा आहे. ग्रंथाचे शेवटीं 'थोर पुरुषांचा परिचय' असें एक परिशिष्ट जोडलें आहे. हें निराळें परिशिष्ट देण्याचें कांहीच कारण दिसत नाहीं. परिशिष्टांतील मजकुरांत प्रमाणबद्धता व सुसंबद्धता यांचा अभाव आढळून येतो. पुस्तकाच्या पहिल्या भागांत मुख्यतः Beer च्या पुस्तकाच्या आधारें मार्क्सचें चरित्र दिलें आहे. कांही ठिकाणीं रा. भुस्कुटे यांनी मजकुराचा विस्तार केला आहे तो केला नसता तर चरित्राची मांडणी

जास्त सुटसुटीत झाली असती. या भागांतच कम्यूनिस्ट जाहिरनाम्याच्या बऱ्याचशा भागाचें भाषांतर दिलें आहे. तें कांहींसें अस्थानीं वाटतें. हें भाषांतर व त्यावरील विवेचन मार्क्सची शिकवण या भागांत यावयास पाहिजे होतें; अगर तें अगदी स्वतंत्र दिलें असतें तरी चाललें असतें. कम्यूनिस्ट जाहीरनामा हा समाजसत्तावाद्यांच्या दृष्टीने इतका महत्त्वाचा आहे की, त्याचे समग्र, सटीप भाषांतर मराठींत अवतरणें अवश्यक आहे.

दुसरा भाग विवेचनात्मक असल्यामुळे तो सामान्य वाचकास साहजिकच कांहींसा दुर्बोध वाटण्याचा संभव आहे. तसेंच, यांतील सर्वच विवेचन रा. भुस्कुटे यांनी मार्क्सभक्तांच्या ग्रंथाच्या आधारें केलें असल्यामुळे मार्क्सच्या सिद्धान्तांचा चिकित्सक विचार कोठेच झालेला नाही. या भागांतील तत्त्वज्ञानविषयक विवेचन साधारण सुबोध आहे. परन्तु अर्थशास्त्रविषयक विवेचन तितकेसें साधलें नाही. अर्थात् हा केवळ पुस्तककर्त्यांचा दोष नाही. मार्क्सचें अर्थशास्त्रच इतकें अवघड आहे की, त्याचें थोडक्यांत सुलभ विवेचन करणें जवळ जवळ अशक्य आहे. दुसऱ्या भागाचा मुख्य दोष म्हणजे त्यांतील निरनिराळीं प्रकरणें जरी बरीं साधलीं असलीं तरी एकंदर मांडणी फार तुटक झाली आहे. मार्क्सच्या शिकवणींतील प्रमुख सिद्धान्त विशद केले आहेत; परन्तु एकंदर शिकवणीचें समालोचन करून तिच्या संकलित स्वरूपाची व परिणामाची कल्पना वाचकास कोठेंच करून देण्यांत आली नाही. यामुळे नवख्यास तरी हा भाग वाचून व्हावा तसा फायदा होणार नाही असें आम्हास वाटतें.

पुस्तकाची भाषा एकंदर सुबोध आहे. कम्यूनिस्ट जाहिरनाम्याचें भाषांतर विशेष चांगलें साधलें आहे; तसेंच दुसऱ्या भागांतील प्रतिपाद्य विषय कठीण असूनहि भाषा क्लिष्ट अगर बोजड झालेली नाही. मराठींतील अर्थशास्त्रीय परिभाषा अजून स्थिरावली नसल्यामुळे रा. भुस्कुटे यांस बरीच अडचण भासली असावी. रा. भुस्कुटे यांनी कांहीं ठिकाणीं सुचविलेले नवीन पारिभाषिक शब्द सोपे व अर्थपूर्ण आहेत. भाषांतर मात्र सर्वत्र ठिकाणीं बरोबर झालें आहे असें नाही. बीरच्या पुस्तकाशीं कांहीं ठिकाणीं आम्हीं भाषांतर ताडून पाहिलें त्यांत चुकीचे अनुवाद आढळले. उदाहरणार्थः—
' This system of acquisition and possession and of the exploitation of mankind is leading even more safely than the increase of population to a breach within the present society which the old system cannot heal, because indeed it has not the power either to heal or create, but only to exist and enjoy.' याचें रा. भुस्कुटे यांनी खालीलप्रमाणे भाषांतर केलें आहे. "संपत्ति निर्माण करण्याच्या व तिच्या विभागणीच्या प्रचलित पद्धतीने आजच्या समाजांतील स्वास्थ्याचा भंग केला आहे. लोकसंख्येची झपाट्याने होणारी वाढ समाजांतील वाढत्या कलहांना कारणीभूत झालेली नाही, तर उद्योगधंद्यांची झपाट्याने वाढ होण्यास जी पद्धति कारणीभूत झाली आहे तीच समाजांतील सर्व अनर्थांचें मूळ आहे' मुळांतील अर्थ अनुवादांत नीट उतरलेला नाही. तसेंच Beer च्या " The con-

nection between these phenomena could not escape *acute intellects* " याचें " ठिकठिकाणीं घडून येत असलेल्या या परिवर्तनांचा काय संबंध आहे ही गोष्ट युरोपीय मुत्सद्यांच्या लक्षांत आली होती " हें भाषांतर केल्यामुळे मुळांतील अर्थ अगदीच बदलला आहे. Utopian Socialism चें " आदर्श साम्यवाद " हें भाषांतर बरोबर वाटत नाही. Utopian हें विशेषण साम्यवाद्यांच्या या पंथाला गौरवपूर्वक लावण्यांत आलें नाही. तें लावण्यांत आदर्श नव्हे तर अव्यवहार्य हा अर्थ अभिप्रेत होता. " मार्क्सच्या कुटुंबांत शेक्सपीअरची कविता वाचण्याचा जणूं काय संप्रदायच बनला होता. त्याने आपल्या तिन्ही मुलींकडून बार्डचें बरेच काव्य तोंडपाठ करून घेतलें होतें " भाषांतराची या उताऱ्यांत ढोबळ चूक झालेली वाटते. दुसऱ्या वाक्यांतील बार्ड म्हणजे कवि या अर्थानें शेक्सपीअरचा इंग्रजी वाक्यांत उल्लेख केलेला असावा. रा. मुस्कुटे यांनी जसें कांही बार्ड म्हणजे एका निराळ्या कवीचें नांव आहे असें भाषांतर केलें आहे.

परिभाषेबाबत एक अडचण पुस्तकांत भासते ती अशी की Socialism व Communism यांना निश्चित असे मराठी प्रतिशब्द रा. मुस्कुटे यांनी ठरविलेले दिसत नाहीत. बरेच ठिकाणीं तर इंग्रजीच शब्द वापरले आहेत. Socialism व Communism यांत रा. मुस्कुटे फरक मानतात किंवा नाही हें कळत नाही व समाजसत्तावाद व साम्यवाद यांचाहि कांही निश्चित अर्थी उपयोग केलेला आढळत नाही.

वर दर्शविल्यापैकी बरेच दोष किरकोळ आहेत. एकंदर मार्क्सबाबत इतके माहितीपूर्ण पुस्तक मराठींत लिहिल्याबद्दल रा. मुस्कुटे अभिनंदनास पात्र आहेत हें निःसंशय आहे.

घ. रा. गाडगीळ

**मुधोळसंस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहासः**-(संपादकः-द.वि.आपटे, प्रकाशकः–आर्यभूषण छापखाना,पुणें.पृष्ठें १६+४+१८७+२६४ परिशिष्टें सूचि १८४ पृ. किं. रु. ५). वरील पुस्तक पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळाचे एक प्रमुख सभासद व महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या इतिहासाचे प्रसिद्ध संशोधक व चिकित्सक श्रीयुत दत्तोपंत आपटे ह्यांनी मुधोळ संस्थानचे अधिपति श्रीमंत सर मालोजीराव ऊर्फ नानासाहेब घोरपडे राजेसाहेब ह्यांच्या आज्ञेनें संपादित केलें आहे. ह्या पुस्तकाच्या प्रकाशनाने मराठी इतिहासाच्या साधनसंपत्तींत एक बहुमोल भर पडली आहे व त्याबद्दल इतिहासाचे अभिमानी सदरहू पुस्तकाचे संपादक व प्रोत्साहक यांचे सदैव ऋणी राहतील. पुस्तकामध्ये जवळ जवळ ७०० पानांचा मजकूर असून त्यांत प्रकाशकाचे दोन शब्द, श्री. मुधोळकरांचा उपोद्घात, संपादकीय निवेदन वगैरे मामुली गोष्टी असून १८७ पानांची एक मार्मिक व विवेचक अशी प्रस्तावना मूळ फारशी साधनांच्या

भाषांतरास जोडली आहे. मुधोळकर घोरपडे यांचें घराणें ज्या वीरांनी व मुत्सद्यांनी पूर्वी भूषविलें त्यांचीं छायाचित्रें, मूळ संस्थापकाचें दक्षिणेंतील आगमन व घराण्यांतील पुरुषांच्या हालचाली दाखविणारे दोन नकाशे, तसेच नमुन्यासाठीं म्हणून ग्रंथास आधारभूत घेतलेल्या फर्मानांचीं व बखरींचीं छायाचित्रें इत्यादि सरंजामाने ग्रंथ भूषविलेला असल्यामुळे ग्रंथसंपादनांत एक आदर्श संपादित ग्रंथ म्हणून त्याचीं थोरवी विशेष आहे.

मुधोळकर घोरपड्यांचें घराणें हें महाराष्ट्रांतील एक अत्यंत जुन्या खानदानीचें प्रसिद्ध घराणें आहे. त्यांच्या दप्तरखान्यांत त्यांच्या घराण्याच्या मर्दुमकीमुळें बहामनी सुलतानांकडून त्यांना वतन, जहागिरीसंबंधें फर्मानें इत्यादि मिळालीं आहेत. ह्या फारशी फर्मानांचें ऐतिहासिक महत्त्व विशेष आहे. ह्या फर्मानांपैकीं जुन्यांतील जुनें फर्मान १३५२ इ. सनांतील असल्यामुळे साधारणपणें चौदाव्या शतकाच्या मध्यापासून तो तहत एकोणिसाव्या शतकापर्यंत म्हणजे पांचशें वर्षांचा एका घराण्याचा इतिहास अनुस्यूत रीतीने सांगतां येण्यासारखा आहे. हीं अशीं बहुमोलाची फर्मानें आजवर अप्रसिद्ध होतीं. मध्यंतरीं तीं सर यदुनाथ सरकार व रावसाहेब सरदेसाई वगैरे विद्वानांकडे त्यांतील अर्थाच्या विशदीकरणासाठी पाठविलीं होतीं असें ऐकण्यांत आहे. त्याचप्रमाणे कोल्हापूरचे डॉ. बाळकृष्ण ह्यांच्याहि तीं पाहण्यांत आलीं होतीं. डॉ. बाळकृष्ण ह्यांनी आपल्या शिवाजीवरील इतिहासाच्या पहिल्या भागांत ह्यांपैकीं काही फर्मानांचा उपयोग केला आहे. परंतु त्यांच्या ग्रंथाचा विषय निराळा असल्यामुळे ह्या फर्मानांच्याकडे विशेष लक्ष देऊन त्यांचें महत्त्व स्पष्ट करण्याचें काम त्यांच्याकडूनहि झालें नाही. प्रस्तुत संपादकांनी मात्र ह्या फर्मानांचा पुरेपुर फायदा करून घेतला आहे व अधिक म्हणजे त्यांच्याच जोडीला घोरपड्यांच्या दप्तरखान्यांतील एक महत्त्वाची फारशी बखर ठेविल्यामुळे एकंदर ग्रंथाला विशेष महत्त्व आलें आहे. ह्या फर्मानांचें व फारशी बखरीचें भाषांतर भा. इ. सं. मंडळांतील एक आस्थेवाईक व मेहनती अभ्यासक रा. ग. ह. खरे ह्यांनी केल्याचें संपादकीय निवेदनांत सांगितलें आहे. प्रस्तुत ग्रंथांत फर्मानें हीं परिशिष्टांत व फारशी बखर ग्रंथाच्या मूळ भागांत दिलीं आहेत. आमच्या मतें ऐतिहासिक साधनांच्या महत्त्वाच्या दृष्टीने प्रसिद्धिक्रमांत एक प्रकारचा विपर्यय झाला आहे. फर्मानें हीं अस्सल प्रकारचीं साधनें म्हणून समजलीं जातात. बखरी वगैरे साधनें हीं दुय्यम प्रकारचीं साधनें म्हणून समजण्याचा प्रघात आहे. बखरींचें ऐतिहासिक महत्त्व परपोषित असतें. आज्ञापत्रें, फर्मानें, तत्कालीन पत्रव्यवहारांसारख्या स्वयंप्रकाशित अशा साधनांच्या बळावर बखरींना प्रकाश प्राप्त होत असतो. तेव्हा फर्मानें हीं ग्रंथाच्या मूळ अंगांत घालून बखर जर परिशिष्टांत दिली असती किंवा दोन्हीं साधनें मूळ अंगांत दिलीं असतीं तर सध्याच्या योजनेंत फर्मानांकडे वाचकांचें जें लक्ष वेधत नाही तें वेधलें असतें हें खास.

इतिहासविचिकित्सेबद्दल संपादकांचा आजवरचा लौकिक फार मोठा आहे. श्रीरंगपट्टणची मोहीम, शिवभारताची प्रस्तावना वगैरे ग्रंथांत आलेलें त्यांचें ऐतिहासिक विवेचन हें तर मनाला पटतेंच. परंतु त्यापेक्षा सरस असें ह्या ग्रंथांतील विवेचन उतरलें आहे. वरील ग्रंथांत आपटे हे इतिहासकार अशा भूमिकेंत दिसतात परंतु ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ते इतिहासकार तर दिसतातच परंतु त्याहिपेक्षा अधिक म्हणजे इतिहासाचे तत्त्वप्रतिपादक असे दिसतात. इतिहास म्हणजे तत्तत्कालीन समाजाच्या हालचालींची गोळाबेरीज असते. तेव्हां एखाद्या राष्ट्राचा एखाद्या कालखंडाचा इतिहास लिहावयाचा म्हणजे त्या कालखंडांतील त्या राष्ट्राच्या एकंदर सामाजिक हालचाली अवश्यमेव विचारांत घ्याव्या लागतात. घोरपडे घराण्याच्या पांचशें वर्षांच्या इतिहासाची स्थूल मांडणी करतांना घोरपडे वंश, भोसले वंश, मराठी घराणीं, महमदी घराणीं, त्यांचा परस्पर संबंध अशा निरनिराळ्या बाबी समाजशास्त्राच्या आधुनिक दृष्टीने पारखून श्री. आपटे ह्यांनी आपले सिद्धांत मांडले आहेत. इतिहासविवेचनाबरोबर तत्त्वविवेचन जें ह्या संपादकांनी ठिकठिकाणीं गोवलें आहे त्यामुळेच ह्या प्रस्तावनेस विशेष महत्त्व आलें आहे.

मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनजागृतीचें हा ग्रंथ म्हणजे एक उत्तम फल आहे असें आणखी एका दृष्टीनें म्हणतां येण्यासारखें आहे. मराठ्यांच्या इतिहासाबाबत प्रत्यहीं नवीं नवीं साधनें उपलब्ध होऊन इतिहासावर अधिक अधिक प्रकाश पडत आहे. पेशवेदप्तराच्या प्रकाशनाने पेशवाई चांगली उजेडांत आणली. शिवचरित्र कार्यालयानें शिवचरित्राच्या विखुरलेल्या साहित्याची जुळवाजुळव केली. शिवशाही व शाहुशाही यांच्यामधील धामधुमीच्या काळासंबंधी खडानखडा माहिती मोठ्या आस्थेवाईकपणाने संभाजी कार्यामार्फत गोळा होत आहे. भारत-इतिहास-मंडळ तर आपल्या पल्लेदार दृष्टीने संशोधनक्षेत्रांत चौफेर निरीक्षण करीत आहे. शहाजीकालाचा इतिहास शिवभारत व राधामाधवविलासचंपु इत्यादि ग्रंथांच्या प्रकाशनाने पुढे आणिला. शहाजीकालाच्या मागे इतिहासकारांची नजर आजवर जात नव्हती, तो प्रांत आतापर्यंत अज्ञात होता. ह्या ग्रंथाने तो ज्ञात करून सोडला आहे. ह्या ग्रंथांत ज्याप्रमाणे एका विशिष्ट शिवपूर्वकालीन घराण्याचा चार पांच शतकांतील इतिहास उत्तम रीतीने मांडून दाखविला आहे, त्याचप्रमाणे दुसऱ्या एका ग्रंथांत अशाच एका शिवपूर्वकालीन घराण्याचा इतिहास त्या घराण्यासंबंधी उपलब्ध झालेल्या साधनांनी परिष्कृत करून मांडून दाखविला आहे. हा दुसरा ग्रंथ म्हणजे मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास हा होय. परंतु प्रस्तुत ग्रंथाच्या बाबतींत एक गोष्ट उघड प्रतीत होते ती ही की, उपलब्ध झालेल्या साधनसामुग्रींत जे कांहीं सोन्याचे कण सापडतात त्याची उत्तम भासूर अशी सोन्याची लड करून पाहणाऱ्यांच्या पुढे ठेवणें हें रा. आपटे ह्यांनी केलें आहे.

महाराष्ट्रांतील समाज, धर्म व भाषा ह्या सर्वांचा बनाव इ. स. च्या चौथ्या पांचव्या शतकाच्या सुमारास पूर्णतेस जाण्याचा मार्ग आक्रमीत होता. उत्तरेकडून निरनिराळ्या प्रांतांतून आलेल्या लोकांचे समाज एकत्र होऊन मराठा समाज बनला. त्यांच्या निरनिराळ्या प्राकृत भाषांच्या मिश्रणाने मराठी भाषा बनली. त्यांच्या धर्मांच्या निरनिराळ्या छायांच्या मिश्रणाने महाराष्ट्र धर्म बनला. असा कांहींसा सरमिसळीचा प्रकार महाराष्ट्राच्या एकंदर घटनेमध्ये दिसून येतो. उत्तरेकडून खाली दक्षिणेंत येणाऱ्या लोकांचा ओघ सातव्या शतकापर्यंतच फक्त चालला होता. एवढेच नव्हे तर त्याच्याहि पुढे चौदाव्या शतकापर्यंत हा देशआक्रमणाचा ओघ चालला होता असें ह्या साधनां-वरून म्हणतां येतें. दिल्ली येथे राशियती चालविणाऱ्या महमदी सुलतानांच्या धार्मिक अथवा राजकीय छळास त्रासून किंवा आपल्या वंशांतील यादवीला वैतागून हिंदु काय किंवा महमदी काय लोक देशत्यागाचा अवलंब करून आपलें रक्षण करून घेत किंवा आपल्या कर्तबगारीस योग्य क्षेत्राचा शोध करीत. गुलाम, घोरी, खिलजी, तुघलक वगैरे सुलतानांच्या अमदानी धामधुमीच्या स्वरूपाच्या होत्या. हिंदुमुसलमानांमध्येच फक्त तेवढ्या वावटळी उठत एवढेंच नव्हे, तर मुसलमानमुसलमानांतहि वावटळी उठत व त्यामुळे दोन्ही पक्ष कमजोर होऊन देशोधडीस लागत आणि मध्यवर्ति राज्य-संस्था खिळखिळी होऊन जाई. दूरस्थ राजपुरुष ह्या खिळखिळीचा फायदा घेऊन बंडावा करून आपापल्या प्रांतांत स्वतंत्र राजे होत. अशा प्रकारचा एक बनाव १३४० च्या सुमारास बनत होता व त्यामुळेच बहामनी राज्याचा संस्थापक व मुधोळकर घराण्याचा आद्य पुरुष ह्या दोघांना दक्षिणेंत यावें लागलें. ह्या दोघांनी आपलें नशीब काढून आपली व आपल्या घराण्याची प्रतिष्ठा राखली. दक्षिणेंतील मन-सबदारांची बंडाळी मोडण्याकरिता इतर सरदारावरोबर अल्लाउद्दीन हसन ह्याची रवा-नगी बादशहाने केली. तो दक्षिणेंत आला तो तेथे कायमचाच बसला. सुजनसिंह हा आपल्या बापाने आपल्या पश्चात् आपलें राज्य पुतण्यास दिलें म्हणून वैतागाने दक्षिणेंत आला.

अल्लाउद्दीन हसन हा दक्षिणेंतील बहामनी राज्याचा संस्थापक होय. ह्याच्या नांवाबरोबर असलेल्या 'बहामनी' ह्या उपपदाची उपपत्ति अद्याप नीटशी लागली नाही. तो एका ब्राह्मणाच्या पदरीं गुलाम म्हणून होता की नाही, बहामनी व ब्राह्मणी ह्या दोन शब्दांचा अन्योन्य संबंध आहे की नाही, बहामनी हा शब्द जुन्या फारशी भाषेंतील वंशवाचक असून त्याच वंशांत हसन जन्मला म्हणून त्याच्या वंशाला व राजवटीला बहामनी नांव पडलें की काय वगैरे बाबी अद्याप वादग्रस्तच आहेत. आणि त्यांचा निकाल ह्या ग्रंथाच्या संपादकांनाहि करतां आला नाही. सध्या तरी ह्या बाबीपुरती सर्व भिस्त फेरिस्तावर ठेवणें इष्ट आहे.

दिल्लीच्या तुघलक सुलतानाची सत्ता खिळखिळी झालेली आहे हें ह्या अल्लाउद्दीन हसनने ओळखलें होतें. इतर मनसबदारांचीहि हीच समजूत होऊन जो तो मनसबदार

मध्यवर्ति राज्याचा लचका तोडून स्वतंत्र होण्याची खटपट करीत होता. राज्याचा प्रसार आटोक्याबाहेर झाला म्हणजे ही अवस्था होतेच. महमद लाचीन, इस्माइल मख, अल्लाउद्दीन हसन, सैफुद्दीन घोरी वगैरे मनसबदार दक्षिणेंत बादशाहीविरुद्ध उठले. तसेंच गुजराथेंत ताघी नांवाचे बंडखोर विरुद्ध उठले. स्वतः महमद तुघलक हा बरानी नांवाच्या इतिहासकाराजवळ आपल्या राज्यासंबंधी जे उद्गार काढतो त्या-वरून ह्या अराजक स्थितीची चांगली कल्पना येते. तो म्हणतो, " माझें राज्य म्हणजे अनेक रोगांनी पछाडलेल्या माणसासारखें झालें आहे. एका प्रांतांत व्यवस्था लावावी तर दुसऱ्या प्रांतांत बंडाळी माजते व तेथे सैन्य पाठवावें तर तिसऱ्याच ठिकाणीं बेबंदशाही सुरू होते. " दक्षिणेंतील बंडखोरांचें पारिपत्य करण्यास त्याने जो सरदार पाठविला तो तिकडेच मिळाला. त्याचा मोड करण्याची तो व्यवस्था करतो तोंच गुजराथेंत बंड झाल्यामुळे त्याला प्रथम तिकडे जावें लागलें. दक्षिणेंतील बंड मोडून सर्व प्रांत स्थिरस्थावर होण्यापर्यंत त्यांनी मजल आणिली होती. इतक्यांत तो गुजराथेंत गेल्यामुळे दक्षिणेंतील बंडखोरांना इकडे चांगलेंच फावलें. त्यांचें बंड यशस्वी होऊन त्यांनी स्वतंत्र राज्यपद स्थापलें. हेंच बहामनी राज्य होय.

हें बहामनी राज्य इ. स. १३४७ सालीं स्थापिलें. त्याच्या अगोदर दोन वर्षे म्हणजे १३४५ च्या सुमारास त्याचा संस्थापक अल्लाउद्दीन हसन हा तुघलकखान नांवाच्या बादशाही सरदाराबरोबर दक्षिणेंत आला. इ. स. १३४५ च्या अगोदर सुमारे दहा बाराच वर्षे सुजनसिंह हा दक्षिणेंत आला. हा भोसले व घोरपडे ह्या दोन्ही घराण्याचा आद्य पुरुष होय. हा सुजनसिंह आपल्या बापाने आपलें राज्य हमीरसिंह ह्या पुतण्याला त्याच्या मुंजा नामक बंडखोराबरील जयाबद्दल दिलें, यामुळें वैतागून आपल्या तरवारीच्या जोरावर आपण आपलें नशीब काढूं म्हणून दक्षिणेंत आला. सुजनसिंह हा सिसोद्याच्या राणाशाखेंतील तेरावा पुरुष होय. शिसोद्यांचा मूळपुरुष राहप हा होय. आमच्या एका स्नेह्याजवळील शिसोद्यांच्या वंशटिपणांत राहप व माहप ह्या नांवांऐवजी राहदजी व महादजी अशीं नांवें दिलीं आहेत. मोडीमध्ये 'द' व'प' हीं दोन्ही अक्षरें बरीचशीं एकसारखीं दिसल्यामुळे कदाचित् ही चूक झाली असावी. राहप व माहप ह्या दोन भावांना आणखी एक श्रवणजी म्हणून भाऊ असल्याचा उल्लेख ह्या यादींत आहे. ह्या श्रवणजीला कुष्ठरोगाचा विकार होता. ह्या राहप राण्याच्या पत्नीचें नांव लक्ष्मीबाई असें होतें. राहपापासून सुरू झालेल्या शिसोद्याच्या राणाशाखे-बरोबर मेवाड येथील रावळशाखा सुरू झाली. ह्या शाखेचा आद्य संस्थापक क्षेमसिंह हा होय. आमच्या जवळील यादींत बाप्पा रावळ ह्यापासून निघालेली एक रावळशाखा देऊन त्यांत चोवीस रावळ होऊन त्यांनी १०१ वर्षे राज्य केल्याचा उल्लेख आहे. त्या शाखेंत कुमिणीसिंह, गोविंद रावळ, महेंद्र रावळ, अंदु रावळ, सिंहा रावळ, शक्त-कुमार रावळ, शालिवाहन रावळ इत्यादि प्रमुख नांवें आहेत. बाप्पा रावळ याने नाग-कन्येशीं विवाह केल्याचें त्या यादींत म्हटलें आहे. त्याप्रमाणे ज्यांच्या नांवांच्या पुढे

दत्त असें उपपद लाविलेलें आहे अशा नांवांच्या राजांची एक याद दिली आहे व त्यामध्ये गुहादत्त हें नांव अखेरचें दिलें आहे. गौरीशंकर ओझा ह्यांनी दिलेल्या मेवाडच्या राजांच्या वंशावळींतील पहिलें नांव गुहिल किंवा गुहदत्त असें आहे. तेव्हा ह्या गुहदत्ताच्या मागील तीं नांवें आहेत की काय हा प्रश्न आहे. यादींतील नांवें पुढीलप्रमाणे आहेत. दप्तदत्त-सिवदत्त-अर्जिदत्त-सूर्यदत्त-सोमदत्त, सिलादत्त, केशवदत्त, नागदत्त भोगदत्त-देवदत्त, आशादत्त, कालभवानदत्त-गुहादत्त, यादीमध्ये 'दत्त' ह्या शब्दावर कांही ठिकाणी अनुस्वार देऊन दंत्त, दंत अशा स्वरूपांत लिहिला आहे. चितोडकर, उदेपुरकर, डोंगरपूरकर, नेपाळकर अशा चारी घराण्यांचा परस्परसंबंध दाखविण्याचा प्रयत्न ह्या आमच्या यादींत केला आहे. टॉड, ओझा वगैरेंनी दिलेल्या यादीशीं ही यादी ताडून पाहतां यावी व झाला तर तिचा योग्य उपयोग व्हावा किंवा निदान तिच्यांत ऐतिहासिक तथ्य कितपत आहे हें पहातां यावे या उद्देशाने ह्या यादीचा उल्लेख केला आहे. हमीरसिंहापासून पुढे सिसोद्याची शाखा चालून श्रीदत्ताजी, कल्याजी, मोकलची, कुंभाराणाजी, रायमलजी, सिंगाराणा, रतनसिंग, विक्रमराणा, उदेसिंग, प्रतापसिंग, अमरासिंग व कर्णसिंग हे पुरुष होऊन त्यांनी शके १५५९पर्यंत राज्य केल्याचा उल्लेख आमच्या यादींत आहे. तसेच सुजनसिंहापासून निघालेल्या पुरुषाच्या नांवासंबंधी थोडासा फरक आमच्या यादींत सापडला तोहि येथे नमूद करतों. सजनसिंग-दिलीपसिंग-सिद्धजी-भैरवजी ( भोसाजी ) असा जो क्रम प्रस्तुत संपादकांनी गौरीशंकर ओझा यांच्या आधारावर दिला आहे, तो आमच्या यादींत सजनीसिंग-महाराज वलिदजी-संगाजी-महाराज भोसाजी असा क्रम दिलेला आढळतो. वरील यादींत आलेल्या पुरुषांचीं हीं नांवें टोपणनांवें असण्याचा संभव आहे. भोसाजीनंतर 'भोसले' घराण्याचा उदय होऊन त्यांत अनुक्रमे—भोसाजी-देवराजजी-प्रतापजी-इंद्रजी-रूपजी-नथुराजजी-याजजी-बहेरजी-दिलाजी—कर्णजी—एकाजी—बाबाजी—मालोजी शहाजी-शिवाजी असे पुरुष उत्पन्न झाले. सातारा, कोल्हापूर येथील भोसले व मुधेळा येथील घोरपडे ह्या दोन घराण्यांच्या सत्तर बहात्तर पिढ्या चांगल्या इतिहासाच्या भरभक्कम पुराव्यानिशी आपणास सांगता येऊ लागल्या हा कांही लहानसान फायदा नव्हे. भोसले घराण्याचा आरंभ वर उल्लेखिलेल्या भोसाजी किंवा भोराजी किंवा वहिरवजी ह्या पुरुषापासून झाला असें वरील यादींत म्हटलें असलें तरी घराण्याचा खरा आरंभ ऐतिहासिकदृष्ट्या बहिरवजीचा पणतु जो शुभकृष्ण त्यापासून झाला आहे. घोरपडे ह्या नांवाची उत्पत्ति जशी आपणास भीमसिंहाने घोरपडीच्या साहाय्याने केलेल्या पराक्रमाच्या आधारावर लाविता येते तशी 'भोसले' ह्या नांवाची उपपत्ति अद्याप आपणास लाविता येत नाहीं. ह्या मुद्यावर प्रस्तुत संपादक किंवा गौरीशंकर ओझा ह्यांनाहि अधिक प्रकाश पाडता आला नाहीं. तेव्हा हाहि मुद्दा गंगोबहामनीच्या उपपत्तीप्रमाणे अद्याप अनिर्णितच राहिला आहे. सुजनसिंहाच्या दक्षिणेंतील काळासंबंधी थोडासा मतभेद होणें शक्य आहे. आमच्या वरील यादींत हमीरसिंह हा शके १२२२

ह्या वर्षी चितोडच्या तख्तीं बसला असें म्हटलें आहे. हा शक शालिवाहन धरला तर १३०० हें साल येतें. आणि हमीरसिंह हा गादीवर बसल्यानंतर वैतागून सुजनसिंह हा दक्षिणेंत येण्यास निघाला असे म्हटलें तर इ. स. १३०० च्या आसपासचें तें वर्ष धरलें पाहिजे. आपलें राज्य दुसऱ्यास दिल्यानंतर ३५ वर्षे तो शांत राहिल्यानंतर वैतागाने देशत्याग करतो व दक्षिणेंत नशीब काढण्यास येतो हें किंचित् असंभवनीय आहे. तेव्हा सुजनसिंह हा १३३४ सनाच्या कांही काल अगोदर दक्षिणेंत आला असावा. टॉड व गौरीशंकर ओझा यांच्या आधारावर प्रस्तुत संपादकांनी जी साखळी जोडली तिच्यामध्ये असलेल्या दुव्यासंबंधी अधिक तपशील देण्याच्या उद्देशानेच ह्या आमच्या यादीचा उल्लेख केला. टॉड ह्याने मोठया प्रयत्नाने सर्व रजपूत घराण्यांच्या वंशावळी त्या त्या घराण्यांतील भाटांच्या वंशस्तुतीवरून व इतर दंतकथांवरून घेतल्या, त्याला पुष्टि गौरीशंकर ओझा ह्यांनी शिलालेख व ताम्रपत्रें ह्यांच्या आधाराने देऊन त्यांत आढळून येणाऱ्या चुका दुरुस्त केल्या. शिवाजीराजे व शेरटचे प्रतापसिंह महाराज ह्या आद्य व अन्त्य छत्रपतींनी आपल्या वंशवृक्षाचें संशोधन चांगल्या जाणत्या पंडिताकडून करवून तो मुक्रर करण्याचा प्रयत्न केला. महाराष्ट्रांतील एका मराठा घराण्याच्या क्षत्रियत्वाबद्दलचा हा अस्सल पुरावा सापडल्यामुळे आता त्याबद्दल शंका राहणार नाही.

प्रस्तुत ग्रंथांतील प्रस्तावनेंत आलेल्या पहिल्या घोरपडे—भोसले ह्यांच्या वंशवृक्षासंबंधीचा मुद्दा येथवर सांगितला. ह्याच्यापुढील विवेचन पुस्तकांत दिलेल्या फारशी बखरीवर व घोरपड्यांच्या फर्मानावर आधारलेलें आहे. बखरीचा लेखक हा विजापुराजवळील गोगी ह्या गांवांतील काझीच्या घराण्यांत जन्मास आल्यामुळे घोरपडे व आदिलशाही ह्यांचे संबंध मोठ्या आस्थेवाईकपणाने सांगतो. बखरीचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग पडतात. त्यांपैकी पहिला भाग हा बखरकाराने मोठ्या तपशिलाने सांगितला आहे. बखरकाराने आपल्या बखरीस ठिकठिकाणीं फेरिस्ताचा आधार घेतल्याने फेरिस्ताच्या ज्या उणिवा त्या ह्या बखरकाराच्या बखरींतहि उतरल्या आहेत. स्वतः फेरिस्ता हाच जर आदिलशाहीच्या उत्तरार्धासंबंधाने विशेष तपशिलाने बोलत नाहीं तेव्हा हा बखरकार तरी त्या काळाचे तपशिल कोठून मिळविणार ? बखरकाराने आपल्या बखरींत दिलेले पुष्कळ तपशिल बहामनी व आदिलशाही शिक्केमोर्तबांनी अंकित झालेल्या फर्मानांनी सिद्ध झालेले पाहिले म्हणजे बखरकाराच्या सत्यकथनाची व इतिहासप्रेमाची तारीफ करावीशी वाटते. मुसलमान इतिहासकारांच्या मनाची इतिहासप्रवण भूमिका खरोखर नांवाजण्यासारखी आहे. ऐनीअकबरी, फेरिस्ता, महमदनामा, अलीनामा, बुसातिने सलातीन, मिरात इ सिकंदरी, सेयर मुताखरीन वगैरे इतिहासाचे फारशी ग्रंथ आश्चर्य वाटण्याजोगे आहेत. इब्न खल्दून, फेरिस्ता, गुलाम हुसेन, सय्यद नुरुद्दीन वगैरे मान्यवर अशा फारशी इतिहासलेखकांच्या बरोबरीने उल्लेख करण्याजोगा हा बखरकार आहे असें त्याच्या ग्रंथावरून

वाटते. ज्याने जवळजवळ पन्नास पुस्तकें हाताळून आपला इतिहास रचला त्या फेरिस्ताच्याच ग्रंथाच्या आधारावर ह्या बखरीची उभारणी झाली असल्याने त्याचेंच महत्त्व बखरीला आलें असल्यास नवल नाही. फेरिस्ताचा विषय बहामनी व तज्जन्य पांच सुलतानशाह्या यांचाच इतिहास सांगणें हा असल्यामुळे तदंगभूत जें घोरपडे घराणें त्याच्या इतिहासाकडे त्याचें लक्ष विशेष गेलें नाही, आणि हा बखरकार हा घोरपड्यांचा ऋणानुबंधी असल्यामुळे साहजीकच त्याने त्यांच्या घराण्याचे तपशील विशेष प्रामुख्याने दिले आहेत.

बहामनी राज्याची स्थापना, विजयनगरच्या हिंदुराज्याची स्थापना व सुजनसिंहाचें दक्षिणेंत आगमन ह्या घडामोडी थोडयाफार फरकाने एकाच कालांत झाल्या. बहामनी राज्य स्थापून हसनगंगोने दिल्लीपासून एक निराळाच सवता सुभा केला खरा परंतु त्याच्या स्थापनेपासून विजयनगर, वारंगळ, तेलंगण येथील हिंदुराजाशीं त्याला सारखें लढावें लागलें. बहामनी सुलतानांच्या कारकीर्दी पाहिल्या तर ह्या हिंदुराजाशीं झालेल्या चकमकींशिवाय इतर कांही गोष्टच झाली नाही असे निदान फेरिस्त्यावरून वाटतें. बहामनींचा इतिहास म्हणजे ह्या रणधुमाळींचा इतिहास होय असा ग्रह होतो. कांही वेळां प्रदेशाक्रमण किंवा सत्ताभिलाष ह्या सारख्या कारणांमुळे लढाया होत तर कांही वेळां सौदागराने सुलतानासाठी आणिलेला घोडा राजाने नेला म्हणून किंवा सुलतानाने पाठविलेल्या गणिकेच्या गाण्याची वरात राजाने पटवून घेऊन पैसे दिले नाहीत म्हणून अशा क्षुद्र कारणांनी लढाया होत व बेसुमार कापाकापी होई. बहामनी सुलतान व घोरपडे घराणें त्या दोघांमध्ये प्रथमपासून दाट ऋणानुबंध असल्यामुळे सुलतानांच्या सर्व लढायांत त्यांच्या बाजूने ते हजर राहून लढत असत. कर्नाटकची स्वारी व तेलंगणच्या दोन्ही स्वाऱ्या ह्यांत सुजनसिंह व त्याचा मुलगा दिलीपसिंह ह्यांनी पराक्रम करून बहामनी सुलतानांस देशप्राप्ति व द्रव्यप्राप्ति करून दिली. इ. स. १३७८ च्या राज्यक्रांतीच्या वेळीं राजधानीचें संरक्षण सिद्धजी व बहिरवसिंह ह्यांनी केलें. पुढे ह्या दोघा पितापुत्रांनी सागर किल्याची ठाणेदारी मिळविली. इ. स. १३९७ च्या मरतुरच्या लढाईत फिरोज सुलतानासाठी सिद्धजी सिसोद्याने आपला देह अर्पण केला. ह्या मदतीमुळेच फिरोजने बहिरवसिंहाला मुधोळचौऱ्यांशीची जहागीर दिली. रायबागच्या युद्धांत देवराज व कर्णसिंह, विजयनगर, कोंकण व रोहणखेड येथील युद्धांत उग्रसेन, शिकंदरच्या युद्धांत व ओढिसा, कोकण व माळवा येथील मोहिमांत कर्णसिंह व भीमसिंह हे पितापुत्र अशा रीतीने घोरपडे घराण्यांतील मुख्य पुरुष पितापुत्रांच्या जोडीने बहामनी सुलतानांची प्रतिष्ठा राखण्याची पराकाष्ठा करीत असत. घोरपडे घराण्याच्या राजनिष्ठेस आधारभूत असलेली बहामनी राशियत नाहीशी झाल्यानंतर त्यांच्या राजनिष्ठेचा ओघ युसफच्या आदिलशाहीकडे वळला व एकदा त्याच्या पक्षांत विलीन झाल्यानंतर मग त्याच्या प्रतिष्ठेसाठी भीमसिंह, खेलोजी, मालोजी, अखयसिंह, कर्ण-

सिंह चोळराज, पिराजी, कानोजी वल्लभसिंह वगैरे उत्तरकालीन घोरपडे वंशजांनी मर्दुमकी गाजविली.

ह्या सर्व कारभारांत घोरपडे घराण्यांतील पुरुषांना कांही गोष्टींचें आपाततः का होईना पण आनुकूल्य मिळालें. त्या आनुकूल्यामुळेच त्यांच्या कर्तबगारीचा ओघ अखंड वरींच वर्षे चालला. बहामनी वंशांतील तेरांपैकीं आठ पुरुषांना शिपाईसुधा मृत्यु न येतां राजकारस्थानाला बळी पडावें लागलें व प्रत्येक वेळीं राज्यक्रांती झाली. ह्या सर्व धावपळींत घोरपडे घराणें मात्र झंझावातांतील लव्हाळ्यासारखें तग धरून राहिलें. ह्या घराण्यांतील प्रत्येक पुरुषाला योग्य वेळीं संतति होऊन त्या संततीला आपल्या बापाच्या तालमींत स्वारीशिकारीचें शिक्षण घेण्यास बापाचीहि हयात लाभली व त्यामुळेच घराण्याची व पराक्रमाची अखंड परंपरा राखतां आली. ह्या शौर्याबरोबर चाणाक्षपणा, सावधानता वगैरे गुणहि घोरपडे घराण्यांत आढळून येतात. बहामनी राजांच्या कारकीर्दीत प्रत्येक राज्यारोहणाच्या वेळीं अल्पशी राज्यक्रांतीच होत असे. त्यावेळीं मोठी समयसूचकता राखून जो पक्ष श्रेष्ठबल असेल त्याचाच पाठपुरावा करून आपला मानमरातब राखणें ह्या धोरणाने घोरपडे वागत असत. राज्यक्रांतीच्या वेळीं आपल्या घराण्यास कांहीं उपसर्ग न लागूं देतां राजकारण खेळणें हें त्यांचें ध्येय पहिल्या सुजनसिंहापासून तो थेट पेशवाईतील भीष्माचार्य मालोजी घोरपडे यांपर्यंत दिसून येतें. महत्त्वाकांक्षाच जबरी नसली तर प्रतिकूल कालांत थप्पड तरी कशी मिळणार? ह्याच्या उलट भोसले घराण्याचें ध्येय दिसतें. त्या सर्वांमध्ये जबर महत्त्वाकांक्षा असून तिच्या पूर्ततेसाठी त्यांनी संकटें सोसून अखेर पुष्कळ काळ उगाच धुमसत न राहतां मुहुर्तभरच का होईना पण आपलें ज्वलित असें तेज दाखविलें.

घोरपडे घराण्याला मिळालेलें हें जें परिस्थितीचें अनुकूल्य त्या बाबीवर प्रस्तुत संपादकांनी पुष्कळ भर दिला आहे. त्याचें हें विवेचन त्यापुरतें तरी मनाला पटल्यावांचून रहात नाही. मानवशास्त्राप्रमाणे येणारे आनुवंशिक गुण व त्यांचा इतिहासांत होणारा परिणाम, तसेंच एखादें घराणें, त्याचें समाजांतील स्थान व तें घराणें व तो समाज ह्यांचे परस्पर संबंध, हें सर्व विचारांत घेऊन संपादकांनी आपले विचार मांडले आहेत. हें सर्व प्रतिपादन एकट्या घोरपडे घराण्याच्या बाबतींत खरें आहे. परंतु एका घराण्यांत आढळून येणाऱ्या परिस्थितीवरून सामान्य सिद्धांत जर बांधले तर ते तितकेसे ठाम होणार नाहीत. ते सदोष होतील. घोरपडे घराण्याचीच परिस्थिति व तेंच आनुकूल्य असूनसुद्धा परिणाम मात्र त्यापासून अगदी भिन्न असल्याचीं उदाहरणें सापडणार नाहीत असे नाही. तेव्हा घोरपडे घराण्याच्या अनुस्यूत प्रतिष्ठेचीं व परंपरेचीं हीं वर दिलेलीं कारणें समवायी स्वरूपाचीं नसून निमित्तस्वरूपाचीं आहेत. त्यापासून सामान्य सिद्धांत बांधावयाला आणखी असल्याच घराण्यांची तपासणी करून पुरावा घेणें जरूर आहे. ह्या सर्व प्रतिपादनाचा आम्ही एवढाच अर्थ समजतों की, संपादकांनी ही एका विशिष्ट घराण्याचा पराक्रम पारखण्याची एक पद्धत सांगितली

आहे. आहे तें विवेचन अत्यंत बांधीव, रेखीव असून मनाला पटल्याखेरीज रहात नाही. ह्या नव्या मांडणीबद्दल कोणीहि त्यांचें अभिनंदनच करील.

आमच्या मतें घोरपडे आणि भोसले ह्या दोन्ही घराण्यांत सारखे प्रसंग असे कांही उद्भवले. शिसोद्या घराण्यांतील भाऊबंदकी टाळण्याच्या उद्देशाने सुजनसिंह जसा दक्षिणेंत आला तसाच त्या घराण्यांतील शुभकृष्ण हाहि पुढे घराण्यांतील भाऊबंदकी टाळण्याच्या उद्देशाने आपल्या देवगिरीच्या जहागिरीकडे गेला. पुढे शिवाजी भोसल्यांनाहि घरांतील एकप्रकारची भाऊबंदकी टाळण्यासाठींच आपल्या पुणें, सुपें येथील वतनवाडीवर यावें लागलें. सुजनसिंह, शुभकृष्ण व शिवाजीराजे हे तिघेजण आपापल्या परीने एकाच हेतूने प्रेरित होऊन एका स्वतंत्र शाखेचे व तत्परत्वें एका स्वतंत्र परंपरेचे आद्य संस्थापक झाले. पुढे सुजनसिंहाने व त्याच्या कांही वंशजांनी बहामनी राजांची इमानेइतबारें सेवा केली. परंतु ती शाही नाहीशी होऊन राज्यनिष्ठेचा आधार जसा तुटला तसा भीमसिंहाने आदिलशाही स्थापण्यास मदत करून युसफ व त्याचे वंशज ह्यांच्याकडे आपल्या राजनिष्ठेचा ओघ चालू केला. असाच प्रसंग शहाजी राजावर आला. त्यांच्याहि राजनिष्ठेचा आधार जो निजामशाहीचा सुलतान तोच नाहीसा झाल्यावर त्यांनाहि आपल्या राजनिष्ठेचा ओघ आदिलशाहीकडे चालू करावा लागला. प्रस्थापित झालेल्या राजसत्तेस कुर्निसात करणें, तिच्या प्रतिष्ठेसाठीं कोणताहि स्वार्थत्याग करणें, व अशा रीतीने आपली व आपल्या घराण्याची प्रतिष्ठा राखणें, ही परंपरा शिसोदे घराण्याच्या घोरपडे व भोसले ह्या दोन्ही शाखांत चांगली शिवाजीच्या उदयापर्यंत दिसून येते. आम्ही ह्याच्याहि पुढे जाऊन असेंहि म्हणतों की ही परंपरा व मनाची भूमिका महाराष्ट्रांतील पुष्कळ ब्राह्मणक्षत्रिय मोठमोठ्या घराण्यांचीहि होती. ह्याला कारणें कांहीहि असोत. कलियुगांत म्लेंछांचा उत्कर्षच होणार म्हणून किंवा दक्षिणेंतील महमदी राज्यांत ब्राह्मणक्षत्रियांच्या कर्तबगारीला पूर्ण वाव होता म्हणून म्हणा वर सांगितलेली मनोभावना होती. मुधोळचे घोरपडे भोसले, जावळीचे मोरे, सुर्वे, निंबाळकर, कराडचे देशपांडे, हुकेरीचे देशपांडे, आकण्णा मादण्णा, चतुर साबाजी, दियानतराव वगैरे राजनिष्ठ सरदारांनी आपल्या मालकांपुढे आपल्या जीवाचीहि तमा बाळगिली नाही. दक्षिणेंतील बहामनीशाही किंवा उत्तरकालीन पांच शाह्या ह्या पोखरल्या जाऊन ज्या अस्तास गेल्या त्याचें कारण हिंदुमुसलमान ह्यांचे भेद नसून त्यांच्या त्यांच्यामधीलच भेद होत. ह्या राशियती जरी महमदी होत्या तरी त्यांमध्ये मनस्वी भेद होते. शिया-सुनी, हिंदुस्थानी दक्षिणी, इराणी तुराणी, मालक गुलाम असे नानाप्रकारचे भेद असून त्यामुळेच हीं राज्यें पोखरलीं गेलीं. ह्याच असल्या भेदांमुळे उत्तरकालीन मोगल बाद-शाहीहि हादरून विच्छिन्न झाली. कोणत्याहि राजवटींतील सिंहासनाधिष्ठित राजा कर्तबगारीने निकामी झाला म्हणजे त्याच्या दिवाणांना फावतें व तेच राजनिर्माते बन-तात. बहामनीशाही, आदिलशाही, निजामशाही ह्या राज्यांत सैफुद्दीन घोरी, इस्माइल मख, तुगलचीन, महमद गवान, मुस्तफाखान, चेंगीजखान, शहाजी भोसले, मलिकंबर

ह्यांनी प्रत्येक राज्यक्रांतींत हातभार लावला. उत्तरकालीन मोगलबादशाहींत असाच झगडा दृष्टीस पडतो. असदखान, झुलफिकारखान, महमद यारखान, अबदुल सय्यद, हुसेन सय्यद, चिनकिलीजखान, गुलाम कादर व शेवटीं महादजी शिंदे ह्या सर्वांनीं ज्या उलाढाली केल्या त्यावरून ही गोष्ट कबूल करतां येण्यासारखी आहे. तेव्हां ह्या शाह्यांच्या अपकर्षाचें कारण त्यांचे त्यांचे भेद व सुलतानांचा कमकुवतपणा हें होय.

बहामनीशाही व अदिलशाही अस्तास गेल्यानंतर घोरपडे यांच्या राजनिष्ठेचें अधिष्ठान नाहीसें झालें व त्यांच्या पराक्रमाचें सातत्यहि नाहीसें झालें. औरस संतति लाभून सुद्धा आनुवंशिक क्षात्रवृत्तीच्या अंकुराचा परिपोष त्यांना करतां आला नाही असें इतिहासावरून दिसतें, व त्यापुरता तरी निदान प्रस्तुत संपादकाच्या विधानाला अपवाद उत्पन्न होतो. खरें पाहिलें तर आदिलशाहीच्या अस्तानंतर घोरपड्यांची राजनिष्ठा भोसले घराण्याकडे यावयास पाहिजे होती. शिवाजीराजे यांनीं अबूलहसन तानाशहाच्या भेटीच्या वेळीं मालोजी घोरपडे यांना आर्जवी पत्र लिहून तानाशहाच्या मदतीस बोलाविलें व त्यांचा पुरस्कार करण्याचें अभिवचन दिलें. परंतु आदिलशहाच्या पडत्या काळांत तिला अंतर दिलें तर आपल्या खानदानीस व आपल्या इभ्रतीस कमीपणा येईल अशा कृतज्ञतापूर्वक हेतूने शिवाजीचें निमंत्रण मालोजीनें नाकारलें. परंतु ह्याच्याहि पुढचा काळ पाहिला तरी भोसले व घोरपडे यांचें कधी सूत जमल्याचें दिसत नाही. शाहूच्या कारकीर्दींतहि घोरपड्यांनी भोसल्याविषयी आपुलकी दाखविली नाही. मालोजीराजे हे कधी भोसल्याकडे तर कधी निजामाकडे असें धोरण ठेवीत असत. शाहूच्या पश्चात् तर सातारा, हैद्राबाद व कोल्हापूर अशीं तीन ठिकाणें आळीपाळीनें आश्रयासाठी ते योजीत. राक्षसभुवनाच्या लढाईंत घोरपडे हे निजामाकडून लढले. पुढे बारभाईच्या अमदानींत एकाच घराण्यांतील एक पुरुष निजामाकडे तर दुसरा पुरुष मराठ्याकडे असा देखावा ह्यांच्या धोरणासंबंधीं दिसून येतो.

ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत आलेल्या विवेचनासंबंधीं येथवर विचार झाला. प्रस्तावनेंतील विवेचनाबद्दल कोणीहि झालें तरी संपादकांना धन्यवादच देईल. मराठी इतिहासाच्या बाबतींत व त्यांत पुन्हा शिवपूर्वकालांत इतिहासशास्त्र व साधनें ह्या दोन्ही बाबींत ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाने अभिनंदनीय भर पडली आहे. मराठ्यांनी राज्ययंत्र, लष्करी पद्धति, राज्यकारभार, जमीनमहसूल वगैरे पुष्कळ गोष्टी बहामनी, आदिलशाही, निजामशाही वगैरे दक्षिणेंतील शाह्यांपासून पुष्कळ अंशानें उचलल्या असल्यामुळे ह्या शाह्यांचा इतिहास जितका बाहेर येईल तितका तो मराठ्यांच्या इतिहासास पोषकच होणार आहे. मराठेशाहीचा इतिहास लिहिणाऱ्यास प्रस्तुत संपादकाचें शास्त्रीय विवेचन मार्गदर्शक होईल ह्यांत शंका नाही. ह्या विवेचनांत राजवाड्यांची सूक्ष्म भेदक दृष्टि आहे; खऱ्यांची आधार देण्याची पद्धत आहे; तात्यासाहेब केळकर यांची इतिहासाकडे इतर शास्त्रांच्या अनुरोधाने पाहण्याची दृष्टि आहे व सरदेसायांची सूत्रबद्ध कथनाची हातोटी आहे. इतकें सर्व घेऊन पुन्हा त्याच्यावर दत्तोपंत आप-

त्यांचा स्वतांचा छाप आहे तो आहेच. असा चतुरस्र संपादक हुडकून काढून त्याच्या हवालीं आपल्या जवळचे सोन्याचे कण देऊन आपल्या पूर्वजांचें ऋण फेडून महाराष्ट्र इतिहासप्रेमी लोकांना त्यांनी ऋणी करून ठेविल्याबद्दल श्रीमंत सर मालोजीराजे ऊर्फ नानासाहेब घोरपडे यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच होईल.

पुस्तकांत मुद्रणदोष फार राहिले आहेत. शास्त्रशुद्ध दृष्टीच्या वाचकाला तर ते दिसतीलच परंतु सामान्य वाचकालाहि दिसल्यावांचून राहणार नाहीत. तसेच फर्मानांत उल्लेखिलेले फारशी किताब व विशेषणें हीं भाषांतरांत दिलीं नसल्याने भाषांतरांत किंचित् उणेपणा राहिला आहे.

कृ. पां. कुलकर्णी.

---

# रद्दींतील रत्नें

रत्न १७ शोधक—संपादक

ज्ञानोदय, १–२–५३

## The Dakshina Fund and the Brahmans.

दक्षणेचे ब्राह्मणांचा जो आजपावेतों घोळ पडला होता तो बहुतकरून उलगडून निमे ब्राह्मणांस दक्षिणा मिळाव्या व ब्राह्मणापैकीं लबाडी करून जे मृत ब्राह्मणांचे नांवाने इतर ब्राह्मण दक्षणा घेत होते त्यांची चौकशी होत आहे व त्यांतील कितीएक आपल्या अपराधास कबूल आहेत. याजवरून त्यांस मोठी शिक्षा होईल असें वाटत नाहीं व जे कारकून त्या कामावर चौकसनीस होते तेही कैदीच आहेत व कितीएक ब्राह्मणांच्या चकत्या गहाळ झाल्या आहेत. सबब त्याचे ओळखीचा पुरावा कमीटीदार घेत आहेत. या वर्षीं सुमारें ११२५ ब्राह्मण होतील असें अनुमान झालें आहे, दिवसेंदिवस ब्राह्मण कमी होत चालले आहेत व जे दक्षणेचे ब्राह्मण आहेत ते बहुतकरून वृद्ध आहेत व त्यांस येण्याचे श्रम देण्यापेक्षां त्यांचे गांवींच त्यांस दक्षणा मिळाल्यास ते ब्राह्मण सरकारचा मोठा उपकार मानतील. बाळाजी नाईक केळकर यांची जी दरसाल दक्षणेच्या ब्राह्मणांस भोजन घालण्याची ख्याती आहे ती त्यांनी कायम ठेविली. येणेंकरून सालमजकुरी ब्राह्मणांचा मोठा बचाव झाला. दररोज सुमारें चारशें पांचशें ब्राह्मण जेवीत होते. याप्रमाणें महिना सवा महिना चालविलें ही गोष्ट मोठ्या उदारपणाची आहे. — ज्ञानप्रकाश.

# परिषद्वार्ता

संमेलनः— मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर (ता. २०।१२।१९३४) लवकरच परिषदेची कचेरी संमेलनासाठी तात्पुरती बडोद्यास नेण्यांत आली होती. रा. चिं. ग. कर्वे हे कार्यकारी मंडळाचे प्रतिनिधि म्हणून बडोद्यास मुद्दाम संमेलनाचे आधी कांही दिवस गेले होते. तेथे त्यांनी परिषदेतर्फे संमेलन-स्वागत-समितीशीं संमेलन-कार्यांत सहकार्य केलें व इतर प्रकारचें परिषदेचें बरेंच कार्य केलें. खुद्द संमेलन ता. २५।२६।२७ डिसेंबर १९३४ या दिवशीं बडोद्यास 'न्यायमंदिरा'त भरलें व अत्यंत यशस्वी रीतीने पार पडलें. परिषदेचे कार्याध्यक्ष हेच संमेलनाचे अध्यक्ष असा अपूर्व योग, आणि तोहि बडोद्यास, जमून आला होता. त्या कारणाने परिषद् व संमेलन यांचें एकरूप विशेष प्रामुख्याने सिद्ध झालें. याशिवाय मागील म्हणजे नागपूरच्या संमेलनांतील एका ठरावास अनुलक्षून परिषद व संमेलन यांची 'परस्पर कार्यमर्यादा' आंखणारी जी एक घटना परिषदेने एका विशेष उपसमितीकडून तयार करवून घेतली होती तीहि घटना परिषदेच्या सभांत मंजूर झाल्यानंतर बडोदें संमेलनास रीतसर सादर करण्यांत आली. या घटनेंतहि परिषद् व संमेलन यांचें ऐक्य व सहकार्य सिद्ध व्हावें अशीच तरतूद केली आहे. अशा तऱ्हेने परिषदेने मंजूर केलेली व संमेलनाने स्वीकारलेली घटना म्हणजेच परिषदेचे परिषद्-संमेलनविषयक नियम व पोटनियम आता पुढील वर्षापासून अंमलांत येणार असल्याने याच अंकांत दुसरीकडे समग्र छापले आहेत. तसेंच संमेलनांत मंजूर झालेले ठरावही याच अंकांत इतरत्र अधिकृतरीत्या छापले आहेत. एकोणिसावें महाराष्ट्र साहित्य संमेलन अत्यंत चांगल्या रीतीने पार पाडल्याबद्दल बडोदें स्वागत-समितीची परिषद् अत्यंत ऋणी आहे.

नियामक मंडळ व परिषदः— पूर्वी ठरल्याप्रमाणे परिषदेच्या नियामक मंडळाची सभा बडोद्यास 'महाराणी चिमणाबाई हायस्कूल' म्हणजेच संमेलनाचा 'प्रतिनिधिनिवास' या स्थळीं ता. २५।१२।३४ इ. या दिवशीं सकाळीं ८॥ वाजतां भरली होती. म. सा. परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत मा. वि. किबे हेच अध्यक्षस्थानीं होते. या सभेंत प्रथमतः मागील अंकीं प्रसिद्ध केलेला 'परिषद्-संमेलन-समिती'च्या शिफारशींचा खर्डा बऱ्याच चर्चेनंतर परिषदेच्या साधारण सभेंत ठेवण्यासाठी प्रि. घारपुरे यांच्या एका तात्त्विक सूचनेसह मान्य करण्यांत आला. तसेंच परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या नागपूरसंमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीचा (मागील अंकीं प्रसिद्ध केलेला) वृत्तांतहि या सभेंत मान्य करण्यांत येऊन त्याबद्दल कार्यकारी मंडळाचे आभारहि मानण्यांत आले. याशिवाय 'परीक्षा-समिती'च्या (मागील अंकीं प्रसिद्ध केलेल्या) शिफारशी व अहवाल हे दप्तरीं दाखल करण्यांत येऊन परीक्षा घेण्याची

योजना व व्यवस्था ताबडतोब करण्यांत यावी असें या सभेंत ठरलें. याच सभेंत परिषदेच्या कचेरीसाठी इमारतयोजनेचा प्रश्न निघून त्याबाबत खालील महत्त्वाचा ठराव मंजूर झाला:—

" म. सा. परिषदेच्या निर्वेध व वाढत्या कार्यासाठी परिषदेची स्वतःची इमारत असणें जरूर आहे असें या सभेचें मत आहे. तरी त्या दृष्टीनें कार्यकारी मंडळाने खटपट करून परिषदेस कायम कचेरीची जोड मिळविण्याची खटपट करावी अशी या सभेची कार्यकारी मंडळास सूचना आहे."

नियामक मंडळाच्या सभेनंतर त्याच दिवशीं व त्याच स्थळीं सकाळीं १०॥ वाजतां परिषदेची साधारण सभा भरली होती. याहि सभेंत श्रीमंत मा. वि. किबे अध्यक्षस्थानीं होते. या सभेंत प्रथमतः मागील अंकीं प्रसिद्ध केलेले परिषदेचे एप्रिल १९३३ ते मार्च १९३४ चे हिशेब (तपासनीसांच्या शेऱ्यासह) व अहवाल हे मंजूर करण्यांत आले. ट्रस्टींच्या हिशेबांपैकी मात्र मागील अंकीं प्रसिद्ध केलेले जानेवारी १९३२ ते मार्च १९३४ चे हिशेब मंजूर करण्यांत येऊन [पत्रिकेच्या वर्ष ५, अंक २।३, पृष्ठ १८ (पुनर्घटना कमिटीचा वृत्तांत), यावर छापलेले] इ. स. १९२७ ते १९३१ चे हिशेब तपासनिसांकडून तपासवून मंजुरीसाठी परिषदेच्या सभेपुढे ठेवावे असें ठरलें. याशिवाय याच सभेंत परिषदेच्या इमारतीसंबंधी नियामक मंडळाने केलेला ठराव कायम करण्यांत आला. यानंतर ही सभा तहकूब झाली. ही तहकूब झालेली सभा ता. २७।१२।३४ रोजीं बडोद्यास संमेलनस्थळीं म्हणजे 'न्यायमंदिरां'त सकाळीं ११ वाजतां भरली होती. श्री. मा. वि. किबे अध्यक्षस्थानीं होते. या सभेंत मुख्यतः नियामक मंडळाने मंजूर केलेल्या परिषद्-संमेलन घटनेचा विचार करण्यांत येऊन मूळ खर्डा (प्रि. घारपुरे यांनी नियामक मंडळांत सुचविलेल्या तत्त्वास अनुसरून प्रो. पोतदार यांनीं शब्दयोजना केलेल्या) एका नवीन नियमासह (परिषद्-संमेलनविषयक पोटनियम नं. ६ पहा) बडोदें संमेलनास रीतसर सादर करण्याकरिता मंजूर झाला. (अशा तऱ्हेने परिषदेने मंजूर केलेले परिषद-संमेलनविषयक नियम त्याच दिवशीं संमेलनाच्या भर बैठकींत सादर करण्यांत आले.) याशिवाय या तहकूब साधारण सभेंत 'परिषद-संमेलन-समिति' यापुढेहि चालू रहावी व तिनें परिषद् व संमेलन यांच्या परस्पर संबंधाबद्दल आणखी आलेल्या सूचनांचा विचार करावा असें ठरलें; आणि तसेंच कारणपरत्वें कार्यकारी मंडळाबाहेरील सभासदांस परिषदेचे जादा चिटणीस म्हणून नेमण्याचा अधिकारहि कार्यकारी मंडळास देण्यांत आला व अशा चिटणिसांत पुढील संमेलनस्थळींचा एक असावा असें ठरलें. यानंतर ही सभा तहकूब करण्यांत आली. ही तहकूब झालेली सभा बडोद्यास ता. २८।१२।३४ रोजीं सकाळीं ९ वाजतां 'प्रतिनिधिनिवासां'त भरली होती. या सभेंत 'परीक्षा'विषयाबद्दल नियामक मंडळाने केलेला ठराव कायम करण्यांत आला. याशिवाय इतरहि कमीजास्त महत्त्वाचे अनेक ठराव या सभेंत मंजूर करण्यांत आले. पैकीं परिषदेने प्रत्येक अधिकृत संमेल-

नास १०० रुपये खर्चासाठी द्यावेत, या ठरावाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. याशिवाय सभेंत परिषदेच्या कार्याविषयीं, विशेषतः 'पात्रिके 'विषयीं, बरीच चर्चाहि झाली. शेवटी यशस्वी संमेलनाबद्दल बडोद्याचे संमेलनचालक व अध्यक्ष यांचे आभार मानण्यांत व अभिनंदन करण्यांत येऊन व इंदूर, मुंबई, सातारा व ठाणें या शहरांतर्फे संमेलनासाठी आलेलीं निमंत्रणें परिषदेस सादर करण्यांत आल्यानंतर सभा बरखास्त झाली.

**कार्यकारी मंडळः—** संमेलनानंतरची कार्यकारी मंडळाची सभा ता. २०।१।३५ रोजीं दुपारीं २ वाजतां परिषदेच्या कचेरींत भरली होती. अध्यक्षस्थानीं श्री. ना. गो. चापेकर होते. या सभेंत प्रथमतः 'महाराष्ट्र साहित्य सभा, इंदूर', या परिषदेशीं 'संलग्न' संस्था म्हणून जोडलेल्या साहित्यसंस्थेस परिषदेच्या नियमाप्रमाणे पुढील म्हणजे विसावें महाराष्ट्र साहित्य संमेलन भरविण्याची रीतसर परवानगी देण्यांत आली. ('संलग्न' व 'सहकारी' संस्थांबाबतचे समग्र नियम व पोटनियम याच अंकांत इतरत्र छापले आहेत.) तसेंच रा. के. ना. काळे यांस रा. रा. दा. देसाई यांच्या राजीनाम्यामुळे रिकाम्या झालेल्या जागेसाठीं परिषदेचे चिटणीस नेमण्यांत आलें. याशिवाय बडोद्यास झालेल्या नियामक मंडळ व परिषद् यांच्या सभांत मंजूर झालेल्या ठरावांची अंमलबजावणीच्या दृष्टीने पाहणीहि करण्यांत आली व त्याच दृष्टीने परिषदेच्या बडोद्याच्या ठरावाप्रमाणे 'परीक्षा 'बाबत प्रत्यक्ष योजना तयार करण्याकरिता श्री. रा. दा. देसाई (अध्यक्ष), श्री. कृ. पां. कुलकर्णी, श्री. चिं. ग. कर्वे आणि श्री. के. ना. काळे (चिटणीस) यांची एक समिति नेमण्यांत आली व परिषदेच्या बडोद्याच्या ठरावास अनुसरून, मूळ कार्यकारी मंडळाने नेमलेली परिषद्-संमेलन-समितीहि पुढे चालू ठेवण्याबद्दलचा रीतसर ठराव करण्यांत आला. तसेंच इमारतीच्या प्रश्नाबद्दलहि या सभेंत विचारविनिमय करण्यांत आला. संमेलनठरावांची पाहणी मात्र पुढील सभेंत घ्यावी असें ठरलें.

**पत्रव्यवहार, प्रचार इत्यादिः—** परिषदेच्या बडोद्याच्या ठरावाप्रमाणे परिषदेचे ट्रस्टी रा. ब. दा. ग. पाध्ये यांस इ. स. १९२७ ते १९३१ चे हिशेब तपासनिसांकडून तपासवून ते कचेरीकडे पाठविण्याबद्दल लिहिलें आहे. त्यास सवडीप्रमाणे ते उत्तर पाठविणार असल्याचें त्यांचें लिहून आलें आहे. शिवाय 'ट्रस्ट फंडासंबंधें वकिली सल्ला जबाबदार रीतीनें घेणें आपणा सर्वांस इष्ट आहे असें मला वाटतें. तसा सल्ला मी घेणार आहे ' असेंही रा. ब. पाध्ये यांनीं लिहिलें आहे.

बडोदें संमेलनांत मंजूर झालेल्या अनेक ठरावांची अंमलबजावणी करण्यास शक्य तें द्रव्यबळ परिषदेस पुरविण्याबद्दल बडोद्याच्या संमेलनचालकांस कचेरीने विनंती केली आहे; व संमेलनाचे शेवटचे हिशेब जमवितांना परिषदेची शक्य तेवढी आठवण ठेवण्यांत येईल असें त्यांजकडून उत्तर आलें आहे.

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर पुढील सभासदांचा परिषदेस लाभ झाला. ( १ ) रा. श्री. ग. भालेराव, नडियाद, ( तहाहयात ); ( २ ) रा. म. पां. सबनीस, बोर्डी, व ( ३ ) रा. पु. दि. ढवळे, नागपूर.

श्रीमंत इचलकरंजीकरांची मासिक देणगी नियमित रीतीने परिषदेकडे जमा होत आहे.

किरकोळः— बडोदें संमेलनाहून परत आल्यानंतर पुण्यास संमेलनाबद्दल महाराष्ट्र शारदा मंदिर व म. सा. परिषद् यांतर्फे एक जाहीर सभा ता. १५।१।३५ रोजीं 'केसरी' कचेरींतील दिवाणखान्यांत भरविण्यांत आली होती. या सभेंत परिषदेचे उपाध्यक्ष प्रो. वा. म. जोशी यांचे अध्यक्षतेखाली अनेक भाषणें झालीं. पैकी परिषदेच्या चिटणिसांनी आपल्या भाषणांत बडोदें संमेलनाचें परिषदेच्या दृष्टीने महत्त्व काय तें थोडक्यांत सांगितलें.

ता. ६।१।३५ चिटणीस, म. सा. परिषद्

---

## डॉ. शं. पु. आधारकर यांची

# परिषद्-संमेलन-समितिविषयक भिन्नमतपत्रिका

[ म. सा. पत्रिका, व. ७, अं. ४, पृ. ३६१ यावर जाहीर केल्याप्रमाणे डॉ. शं. पु. आधारकर यांची भिन्नमतपत्रिका प्रसिद्ध करण्यांत येत आहे. याबाबत प्रथमतः त्यांचें मूळ भिन्नमतप्रदर्शक पत्र व नंतर समितीच्या शिफारशींबाबत त्यांची भिन्न मतें क्रमवार खालीलप्रमाणे देण्यांत येत आहेत.—चिटणीस. ]

श्री ३५ बालीगंज सर्क्युलर रोड, कलकत्ता.

ता. ४।१२।३४.

प्रो. दे. द. वाडेकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, यांसः—

कृ. सा. न. वि. वि.—

आपलें ता. २ डिसेंबरचें क्रमांक १९६३ चें पत्र व त्यासोबत आलेला संमेलन-परिषद्-समितीचे अहवालाचा पक्का मसुदाहि पोंचला. मला या मसुद्यावर सही करितां येत नाही असें खेदाने म्हणावें लागतें. मी उपस्थित केलेले मुद्दे अध्यक्ष प्रि. गाडगीळ यांनी समितीचे अधिकाराबाहेरचे आहेत असें ठरविले व त्याकारणाने त्या मुद्यांचा विचारच केला नाही हेंहि कळलें.

मला स्वतःला अध्यक्षांनी दिलेला समितीचे कार्यक्षेत्रासंबंधाचा निर्णय मान्य नसल्यामुळे मी या समितीचे कामांत जास्ती भाग घेऊं इच्छीत नाही. अहवालाच्या मसुद्यांत जो समितीच्या कार्यमर्यादेसंबंधी भाग आहे तो भ्रामक आहे. या ठिकाणीं मूळ ठरावच उद्धृत करावयास पाहिजे. या ठरावांत 'परिषद् व संमेलन हीं परस्परांस जबाबदार राहून एका आंखीव धोरणाने सहकारपूर्वक वाङ्मयकार्य करितील अशी एखादी व्यवहार्य योजना तयार करणें' हा उद्देश दिला आहे.

आपण पाठविलेल्या मसुद्यांत परिषद् व संमेलन परस्परांस जबाबदार असण्यासंबंधी उल्लेख सुद्धा नाही. फक्त संमेलनास आमंत्रण कोणीं व केव्हां, तसेंच त्यांतील सभासदांस नियामक मंडळांत घेणें, यासारख्या किरकोळ गोष्टींचाच विचार आहे. तसेंच मसुद्यांतील योजना अव्यवहार्य आहे असेंहि माझें मत असल्यामुळे मला आपण पाठविलेल्या मसुद्यावर सही करितां येत नाही.

समितीच्या कार्य करण्याच्या पद्धतीवरून पाहतां तिच्या हातून 'व्यवहार्य' योजना होणेंच कठीण. अशा तऱ्हेच्या योजना व्यापक तत्त्वांवर कराव्या लागतात. व्यापकपणें कोणत्याहि प्रश्नाकडे पाहिल्याखेरीज हल्लीचा चिखलांत रुतलेला गाडा वर यावयाचा नाही. परंतु जेथे शब्दमर्यादेच्याच पलीकडे जावयाचें नाही असें ठरलेलें तेथे हें कसें व्हावयाचें. असो. एवढेच पुरें, क. लो. असावा, ही विनंती.

आपला

(सही) शं. पु. आघारकर

ता. कः— सदर पत्र समितीच्या अहवालास भिन्नमतपत्रिका म्हणून जोडावें.

(सही) शं. पु. आ.

## परिषद् संमेलन–समितीच्या शिफारशी

### (अ) समितीची कार्यमर्यादाः—

परिच्छेद नं. १— नागपूर संमेलनाचा सबंध ठराव येथे उद्धृत करावयास पाहिजे.

परिच्छेद नं. २— हा निर्णय मला मान्य नाही. याबद्दलच्या स्पष्ट सूचना पाहिजेत.

## ( ब ) समितीच्या शिफारशी

**शिफारस नं. १–** हें कलम अजीबात गाळावें.

**शिफारस नं. २–** जरुरी नाही. या कालमर्यादेचा कांहीएक व्यावहारिक उपयोग नाही.

**शिफारस नं. ३–** यासंबंधी निर्णय कार्यकारी मंडळानेच संमेलनापुढे ठेवावयाचा. यावर चर्चा करण्याचा संमेलनास अधिकार नसावा.

**शिफारस नं. ४–** ही सर्व गुंतागुंतीची योजना असून त्यापासून हिशेबाचे घोटाळे माजतील. सबब अव्यवहार्य योजना आहे.

**शिफारस नं. ५–** नियामक मंडळ अजीबात रद्द करावें असें माझें मत आहे. मी स्वतः त्याचा सभासद आहें. नियामक मंडळास कांहीं करितां येतें असें मला वाटत नाही.

**शिफारस नं. ९–** 'शक्य तों' गाळा. ( संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावांची अंमलबजावणी परिषदेने केलीच पाहिजे. )

## ( क ) शिफारशींबद्दल तात्त्विक खुलासा

**शिफारस नं. २ व ३–**ही नियमाने उत्पन्न होईल काय ? परिषद् जोपर्यंत संमेलनासंबंधी जबाबदारी घ्यावयास तयार नाही तोपर्यंत हें असेंच चालावयाचें. परिषदेने स्वतः किंवा स्थानिक संस्थांच्या सहकार्याने संमेलन भरविलें पाहिजे. ही जबाबदारी परिषद् जोपर्यंत घेऊं इच्छीत नाही तोपर्यंत हा वाद मिटण्याची आशाच नाही. घटनेंतील हें कलम गाळलें पाहिजे.

**शिफारस नं. ४, ५ व ६–**या नवीन वर्गाच्या सभासदांनी काय करावयाचें ? त्यांचा उपयोग काय ?

**शिफारस नं. ८–**या ठिकाणीं अध्यक्षांची अरेरावी ( नागपूर संमेलनासारखी ) चालू करण्याचा संभव आहे.

**शिफारस नं. ९–**हें संमेलन कबूल करणार नाही. तरीहि 'शक्य तों' अशी पळवाट आहे.

(सही ) शं. पु. आघारकर.

माझें पत्र ही भिन्नमतपत्रिका होय. तसेंच शिफारशींसंबंधी माझे विचार वर दिले आहेत.

तारीख ४-१२-३४. ( सही ) शं. पु. आघारकर.

# बडोदें येथील साहित्यसंमेलनांत मंजूर झालेले ठराव

१. नागपूर येथे भरलेल्या संमेलनानंतर आजतागायत पुढे निर्दिष्ट केलेले व इतर जे साहित्यसेवक व साहित्याभिमानी निधन पावले त्यांच्या निधनाने मराठी भाषेची मोठी हानी झालेली आहे, याबद्दल या संमेलनास अतिशय दुःख वाटतें:—

(१) श्री. संपतराव गायकवाड, (२) श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, (३) श्री. बापूजी मार्तंड आंबेकर, (४) श्री. खंडेराव चिंतामण मेहेंदळे, (५) श्री. कृष्णाजी अर्जुन केळूसकर, (६) श्री. श्री. रा. बोबडे, (७) श्री. वि. रा. चौगुले, (८) श्री. नारायणराव भवानराव पावगी, (९) श्री. अनंत नारायण भागवत, (१०) श्री. लिंबकराव गोगटे, (११) श्री. द. ग. सारोळकर, (१२) श्री. गणेश बळवंत आवेगांवकर.

२. सरकारने पोस्टाचे दर वाढविल्यामुळे वाङ्मयप्रसाराच्या कार्यास व्यत्यय येत आहे, तेव्हा हे दर पूर्ववत् करण्याविषयी हें संमेलन सरकारला आग्रहाची विनंती करीत आहे.

३. महाराष्ट्र विद्यापीठ लवकर स्थापन व्हावें अशी या संमेलनाची तीव्र इच्छा आहे. एतदर्थ 'महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन'प्रभृति संस्थांकडून व मंडळींकडून जे प्रयत्न चालू आहेत त्यांस या संमेलनाचा पाठिंबा आहे. आणि जनतेने व सरकारने हें विद्यापीठ लवकर स्थापन करण्याची खटपट करावी अशी या संमेलनाची विनंती आहे.

४. इंदूर आणि ग्वाल्हेर दरबारांकडून मराठी वाङ्मयाच्या पुरस्कारासाठी दरसाल कांहीं रकमा खर्ची पडून लेखकांना जें चांगलें उत्तेजन मिळे तें आता मिळत नसल्याचें पाहून या संमेलनास वाईट वाटत आहे. या दरबारांनी आपल्या ग्रंथोत्तेजक कार्यास पुन्हा सत्वर आरंभ करावा अशी त्यांस या संमेलनाची विनंती आहे.

५. शुद्धलेखनसमितीच्या नियमांप्रमाणे यापुढे लेखक, संपादक आणि प्रकाशक यांनी, तसेंच सरकार व विश्वविद्यालय यांनी आपली पुस्तकें छापावीं व नव्या शुद्धलेखनाचा प्रसार करावा अशी त्यांना या संमेलनाची विनंती आहे.

६. मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाच्या ज्या तीन प्रती सरकार प्रकाशकाकडून घेतें त्यांचा संग्रह करून व ग्रंथालय बनवून त्यांचा उपयोग अभ्यासकांस होईल अशी व्यवस्था सरकारने करावी अशी या संमेलनाची सरकारास विनंती आहे.

७. मराठी भाषाभिवृद्धीचें कार्य 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'स सतत व व्यवस्थित करिता यावें यासाठी परिषदेला कचेरी आणि ग्रंथसंग्रह यांकरितां कायमची जागा असणें जरूर आहे. तसेंच परिषदेचा कायमनिधीहि बराच मोठा असावयास पाहिजे. तरी धनिकांनी साहित्यभक्ति ठेवून परिषदेला उदार द्रव्यसाहाय्य करावें अशी त्यांना या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

८. 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चें कार्य व्यापक आणि सार्वमहाराष्ट्रीय होणें अत्यावश्य असल्याने ठिकठिकाणच्या वाङ्मयसंस्थांनी परिषदेशीं 'संलग्न' किंवा 'सहकारी'

संस्था या नात्याने संबंध जोडावा अशी या संमेलनाची त्यांना कळकळीची शिफारस आहे.

९. इतर भारतीय भाषांच्या संस्थांशीं सहकार्य करून सर्व संस्कृतोत्पन्न भाषांसाठी देवनागरी लिपी नक्की करण्याकरिता एक समिति नेमावी व त्या समितीने आपला वृत्तांत संमेलनांत सादर करावा.

१०. साहित्य संमेलनाचा एकत्र आणि सुसंगत असा इतिहास परिषदेने अधिकारी लेखकाकडून लिहून घेऊन पुढील संमेलनापूर्वी प्रसिद्ध करावा.

११. संमेलनाचे साद्यन्त अहवाल 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत यावेत व छपाईचा खर्च त्या त्या संमेलनाच्या स्वागत मंडळाने सोसावा.

१२. महाराष्ट्रापासून दूर असलेल्या परप्रांतांतील खासगी मराठी शाळांस जनतेने अल्प स्वल्प वार्षिक मदत देऊन त्यांच्या प्रयत्नाची बूज करावी.

१३. पूर्वी ज्यांची मातृभाषा मराठी होती, परंतु आता ज्यांनी इतर भाषांचा स्वीकार केला आहे अशा लोकांत मातृभाषेचें पुनरुज्जीवन करण्याकरिता परिषदेने प्रचारकार्य अंगावर घ्यावें.

१४. महाराष्ट्र साहित्य परिषदेशीं संलग्न असलेल्या बेळगांव येथील 'वाङ्मय-चर्चामंडळ' या संस्थेने नाट्याचार्य, नाटककार व नट कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें त्यांच्या जिल्ह्याच्या ठिकाणीं म्हणजे बेळगांव येथे 'किर्लोस्कर-मंदिर' बांधून कायमचें स्मारक करण्याचें योजिलें आहे. महाराष्ट्र साहित्याला अत्यंत उपयुक्त अशा नाट्यवस्तु व नाट्यग्रंथ यांच्या परिपूर्ण संग्रहाची जोड या स्मारकमंदिरास देण्यांत यावयाची आहे. या योजनेस या संमेलनाचा पूर्ण पाठिंबा आहे.

१५. मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेश परीक्षेच्या इंग्रजींशिवाय सर्व विषयांचें शिक्षण व परीक्षा मातृभाषेंतून घ्याव्या अशी या संमेलनाची शिफारस आहे.

१६. या संमेलनाला महाराष्ट्र साहित्यांत शास्त्रीय ग्रंथांची अत्यंत उणीव भासत आहे व ही दूर करण्याच्या दिशेने चाललेल्या पुणें येथील 'महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळा'च्या कार्याची माहिती त्यास असून शास्त्रीय ग्रंथांची वृद्धि होण्याकरिता हें संमेलन सर्व शास्त्रज्ञांना अशी विनंती करते की, प्रत्येक शास्त्रावर माध्यमिक व उच्च शिक्षणक्रमांत वापरता येईल, त्याचप्रमाणे ज्याचा स्वतंत्र अभ्यासाकरिता उपयोग करितां येईल, असा एक एक ग्रंथ येत्या वर्षांत त्या त्या शास्त्रज्ञांनी तयार करून प्रसिद्ध करावा; आणि शिवाय हें संमेलन 'मुंबई विश्वविद्यालया'ला अशी विनंती करते की, सर्व शास्त्रांवर स्वतंत्र अभ्यासाकरिता मराठी भाषेंत ग्रंथनिर्मिति होण्याची योजना मुंबई विश्वविद्यालयाने शक्य तितक्या लवकर करावी.

१७. (अ) 'पेशवे दप्तरा'चे पंचेचाळीस खंड प्रसिद्ध केल्याबद्दल हें संमेलन मुंबई सरकारचे आभार मानीत आहे.

४५८

(आ) पेशवे दप्तराच्या खंडांच्या किंमती या संमेलनाच्या मतें फार भारी आहेत. सबब हें संमेलन मुंबई सरकारास अशी विनंती करीत आहे की, त्यांनीं सदर खंडांच्या किंमती एक रुपयास छापील दोनशें पृष्ठें या प्रमाणांत आकारून सवलतीनें सर्व लोकांस हे खंड उपलब्ध करून द्यावेत.

१८. कीर्तनसंस्था ही एक साहित्यांतील महत्त्वाची संस्था आहे आणि त्या संस्थेची जोपासना करण्याचें व तिला योग्य वळण लावण्याचें कार्य संमेलनानें करावें.

१९. सन १९३१ च्या खानेसुमारींत खानदेशी अगर अहिराणी व कोंकणी या दोन प्रांतिक भाषा मराठीपासून पृथक् काढून त्या स्वतंत्र भाषा आहेत असें ठरविल्यामुळे मराठी भाषकांचें संख्याबळ घटणार; यासाठी या प्रांतिक भाषा मराठीच्याच उपभाषा आहेत की नाहीत हें ठरविण्यासाठी या संमेलनानें तज्ज्ञांची एक समिति नेमून तिजकडून अधिकृत मत पुढील अधिवेशनाकरतां मागवावें.

२०. वर्तमानपत्रांचा प्रसार वाढत आहे व लोकशिक्षणाचें साधन या दृष्टीनें त्यांचें महत्त्व मोठें आहे. तेव्हा योग्य संपादकांचा पुरवठा व्हावा म्हणून एक वृत्तपत्र-विषयक शिक्षणशाखा व पदवी चालवावी अशी मुंबई विश्वविद्यालयास या संमेलनाची शिफारस आहे.

२१. हें साहित्य संमेलन अखिल महाराष्ट्रांतील सर्व वर्तमानपत्रांना आणि नियतकालिकांना अशी सविनय विनंती करते की, त्यांनी आपल्या वर्तमानपत्रांतून आणि नियतकालिकांतून सुबोध शास्त्रीय आणि औद्योगिक लेखांना प्रमुख स्थान अवश्य द्यावें.

२२. राष्ट्राच्या आकांक्षा व्यक्त करणाऱ्या व तरुण पिढीला मार्गदर्शक होणाऱ्या अशा ज्या राजकीय पुस्तकांवर, त्याचप्रमाणे कामगारांच्या हिताच्या दृष्टीनें लिहिल्या गेलेल्या पुस्तकांवर सरकारनें जे निर्बंध घातले आहेत त्या निर्बंधांमुळे लेखन-, मुद्रण-व प्रकाशन-स्वातंत्र्याची पिच्छेहाट होत आहे. अशा वाङ्मयावरील जप्ती उठवून सदर निर्बंध सरकारनें काढून घ्यावे असा प्रयत्न करण्यासाठीं हें संमेलन पुढील उपसमिति नेमीत आहे: (१) श्री. वि. रा. शिंदे (अध्यक्ष), (२) प्रो. ध. रा. गाडगीळ, (३) श्री. पां. वा. काणे, (४) श्री. न. चिं. केळकर, (५) डॉ. गो. स. घुर्ये, (६) प्रो. ना. के. बेहरे, आणि (७) श्री. य. रा. दाते (चिटणीस).

२३. निर्मल आनंद व उदात्त भावना यांची जागृति हे सर्व ललित वाङ्मयाचें ध्येय आहे हें विसरून कित्येक लेखक क्षुद्र विकारांना चेतविणारें लिखाण कळत न कळत लिहीत असतात. अशा अनिष्ट लिखाणांचा हें संमेलन निषेध करीत आहे.

| | |
|---|---|
| स. वि. देशपांडे, | ना. गो. चापेकर, |
| चिटणीस, | अध्यक्ष, |
| म. सा. संमेलन, बडोदें. | म. सा. संमेलन, बडोदें |
| २१।१।३५ | २४।१।३५ |

७५१

# परिषद्संमेलनविषयक नियम व पोटनियम

[ म. सा. परिषदेच्या मूळ घटनेंत संमेलनाविषयी कांही नियम असून परिषद् व संमेलन यांच्या परस्पर कार्यमर्यादेसंबंधी परिषदेने कांही नवीन पोटनियमहि अलीकडे केले आहेत. हे पोटनियम परिषदेने आपल्या बडोद्याच्या ता. २७।१२।३४ च्या सभेंत मंजूर केले व ते त्याच दिवशींच्या संमेलनाच्या भर बैठकींत संमेलनाला सादर करण्यांत आले. हे नियम व पोटनियम समग्र अवलोकनाच्या सोयीसाठी खाली एकत्र दिले आहेत. ता. १५।१।१९३५. ]

## घटनेंतील संमेलनविषयक नियम

( नियम नं. ४३–४७ )

( १ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें उद्दिष्ट कार्य उत्तम रीतीनें व्हावें म्हणून व ठिकठिकाणच्या लोकांमध्ये जागृति उत्पन्न करून भाषाविषयक प्रयत्न वाढविण्याकरिता दरसाल मराठी भाषा बोलणारांचीं संमेलनें, साहित्यविषयक ग्रंथांचीं व वस्तूंचीं प्रदर्शनें, तसेंच साहित्यचर्चा करण्याकरिता साहित्यभक्तांच्या विशेष सभा घडवून आणणें अवश्य आहे. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने किंवा परिषदेचे परवानगीने कोणत्या तरी परिषदेशीं ' संलग्न ' किंवा ' सहकारी ' संस्था या नात्याने संबंध जोडलेल्या संस्थेने असें संमेलन किंवा प्रदर्शन शक्य तर दरसाल भरवावें. अशीं संमेलनें किंवा प्रदर्शनें भरविण्याची सर्व जबाबदारी परिषदेची कचेरी असेल त्या गांवीं परिषदेच्या कार्यकारी मंडळावर व इतरत्र त्या त्या ठिकाणच्या संलग्न अगर सहकारी संस्थांवर राहील, व तत्प्रीत्यर्थ स्वागत मंडळ, स्थानिक चिटणीस वगैरे विशिष्ट कार्यकर्ते लोक नेमण्याचें कामहि त्या त्या संस्थांचें आहे.

( २ ) संमेलनाचें स्थल मुक्रर करणें व त्यासंबंधी इतर सर्व तजविजी करणें हें काम कार्यकारी मंडळाचें आहे. साहित्य-परिषदेचे जे सभासद संमेलनास प्रतिनिधि म्हणून हजर राहतील त्यांस प्रतिनिधित्वाबद्दल एक रुपयापेक्षा अधिक वर्गणी नसावी.

( ३ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे सभासद व स्वागतमंडळाचे सर्व सभासद यांनाच आणि संमेलनाचें स्वागतमंडळ ठरवील त्या अटीवर प्रतिनिधि होणारांनाच फक्त त्या त्या संमेलनांत प्रतिनिधि म्हणून येता येईल. इतर लोक प्रेक्षक किंवा निमंत्रित पाहुणे म्हणून येऊं शकतील. पण त्यांस भाषण करण्याचा किंवा मत देण्याचा अधिकार नाही.

( ४ ) संमेलनाचा अध्यक्ष नेमावयाचा तो परिषदेच्या कार्यकारी मंडळाने सुचविलेल्या गृहस्थांपैकी एक स्वागतमंडळाने नेमावा.

( ५ ) संमेलनाधिकाऱ्यांनी संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावांची अधिकृत प्रत संमेलन झाल्यापासून पंधरा दिवसांच्या आंत परिषदेच्या कचेरीकडे पाठवावी.

## परिषद्संमेलनविषयक पोटनियम

( १ ) पुढील संमेलन भरविणाऱ्या संस्थेने संमेलनास द्यावयाचें रीतसर आमंत्रण संमेलनाच्या भर बैठकींत न देतां तें संमेलनापूर्वी निदान दोन आठवडे आगाऊ परिषदेकडे पाठविलें पाहिजे.

( २ ) अशीं रीतसर निमंत्रणें परिषदेकडे आल्यानंतर परिषदेच्या कार्यकारी मंडळाने त्यांचा विचार करून त्यांपैकी कोणतें स्वीकारावयाचें तें निश्चित करावें व अशा रीतीने स्वीकारलेलें निमंत्रण संमेलनाच्या भर बैठकींत औपचारिक रीत्या सादर करण्यांत यावें. इतरहि निमंत्रणें परिषदेकडे आलीं असल्याची माहिती संमेलनास देण्यांत यावी.

( ३ ) परिषदेचे साधारण किंवा अधिक उच्च दर्जाचे सभासद नसलेले संमेलनाच्या स्वागतमंडळाचे सभासद व संमेलनाधिवेशनाचे प्रतिनिधि या सर्वांबद्दल प्रत्येकीं एक रुपया वर्गणी स्वागतमंडळाने परिषदेकडे जमा करावी. अशी वर्गणी जमा झालेले सर्व सद्गृहस्थ त्या वर्षापुरते परिषदेचे "संमेलन-सभासद" समजण्यांत येतील. परंतु त्यांना नियामक मंडळांतील आपले प्रतिनिधि निवडण्याशिवाय इतर सभासदत्वाचे हक्क असणार नाहीत. प्रतिनिधि निवडण्याचा हा हक्क मात्र त्यांस तावडतोब प्राप्त होईल. अशा सभासदांस परिषदेचे साधारण सभासद होणें असल्यास त्यांची स्वागतमंडळाकडून आलेली एक रुपाया वर्गणी साधारण सभासदत्वाच्या एकंदर वर्गणीकडे जमा धरली जाईल.

( ४ ) परिषदेच्या नियामक मंडळाच्या घटनेंत हल्ली चार प्रकारचे सभासद आहेत; यांशिवाय "संमेलन-प्रतिनिधि" असा सभासदांचा पांचवा वर्ग नियामक मंडळांत असावा. या वर्गांत ( अ ) "संमेलनाध्यक्ष" ( अधिकारतः ), ( आ ) स्वागतमंडळांतील ( वर कलम ३ मध्ये उल्लेखिलेल्या ) 'संमेलन-सभासदां'चे पांच प्रतिनिधि—"स्वागत-प्रतिनिधि" ( स्वागताध्यक्ष हे नियामक मंडळाचे सभासद आगाऊच नसल्यास या पांचांत त्यांचा समावेश व्हावयास पाहिजे ), आणि ( इ ) स्वागतमंडळाबाहेरील 'संमेलन-सभासदां'चे पांच प्रतिनिधि—"अधिवेशन-प्रतिनिधि"—असे एकूण अकरा सभासद असावेत. अशा रीतीने नियामक मंडळाचे एकूण सभासद ९१ असावयाचे.

( ५ ) नियामक मंडळांतील "संमेलन-प्रतिनिधीं"ची निवडणूक प्रत्येक वर्षी संमेलनाच्या वेळीं होईल व या प्रतिनिधींचें सदस्यत्व एक वर्षापुरतें राहील. संमेलन-प्रतिनिधींच्या निवडणुकीची जबाबदारी स्थानिक स्वागतमंडळावर राहील. संमेलनाच्या पहिल्या दिवशीं अध्यक्षीय भाषण संपल्यावर भर संमेलनांतच 'संमेलन-प्रति-

निधीं'ची निवडणूक करण्यांत यावी. व लागलीच या प्रतिनिधींची यादी स्वागतमंडळाच्या अधिकाऱ्यांनी परिषदेच्या अधिकाऱ्यांस पुरवावी. संमेलनप्रसंगीच्या नियामकमंडळाच्या सभेची सूचना अशा संमेलनप्रतिनिधींस आयत्या वेळीं दिली तरी ती नियमबाह्य समजण्यांत येऊं नये.

( ६ ) अकरा 'संमेलन-प्रतिनिधीं'सह एक्याण्णव सभासदांचें नियामक मंडळ हेंच संमेलनाची " विषय-नियामक-समिति " समजण्यांत यावी. नियामक मंडळाच्या चौपन्न 'प्रादेशिक सभासदां' पैकी जे सभासद संमेलनास हजर राहूं शकत नसतील त्यांना आपल्यातर्फे लेखी दाखला देऊन ' बदली सभासद ' संमेलनाच्या विषय-नियामक-समितीच्या कामापुरते नेमतां येतील. मात्र असे बदली सभासद म. सा. परिषदेचे सभासद असले पाहिजेत व ते मूळ सभासदांच्या गैरहजेरींतच काम करूं शकतील. मूळ सभासद हजर असतील त्यावेळीं बदली सभासदांस काम करतां येणार नाही.

( ७ ) संमेलनांत मांडावयाचे ठराव संमेलनापूर्वी निदान आठवडाभर स्वागतमंडळाकडे आले पाहिजेत. या ठरावांतून विषय-नियामक-समितीने ( नियामक मंडळाने ) मंजूर केलेले अथवा संमेलनाध्यक्षांनी विशेष कारणाकरिता आयत्या वेळीं परवानगी दिलेले ठरावच संमेलनांत मांडण्यांत येतील.

( ८ ) संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावांची शक्य तों अंमलबजावणी परिषदेने केली पाहिजे.

( ९ ) ठिकठिकाणीं साहित्य संमेलनें भरविणें हें परिषदेचेंच एक कार्य आहे; त्यास अनुसरून जेथे जेथे परिषदेच्या परवानगीने अधिकृत असें साहित्य संमेलन भरविण्यांत येईल तेथील स्वागतमंडळास संमेलनखर्चास मदत म्हणून १०० ( शंभर ) रुपये परिषदेकडून देण्यांत येतील.

---

# संलग्न व सहकारी संस्थांसंबंधी नियम व पोटनियम

[ म. सा. परिषदेच्या मूळ घटनेंत ' संलग्न ' व ' सहकारी ' संस्थांसंबंधी कांही नियम असून त्यासंबंधीचे कांही पोटनियमहि परिषदेने केले आहेत. हे पोटनियम परिषदेने आपल्या नागपूरच्या २४।१२।३३ च्या सभेंत मंजूर केले. हे नियम व पोटनियम समग्र अवलोकनाच्या सोयीसाठी खाली एकत्र दिले आहेत. ता. १५।१।१९३५ इ. ]

## घटनेंतील संलग्न व सहकारी संस्थांबाबत नियम

( नियम नं. ४८–५४ )

### संलग्न संस्था

( १ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे उद्देश मान्य असणाऱ्या व परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या अशा वाङ्मयविषयक संस्था अनुक्रमें (१) 'संलग्न संस्था' किंवा ( २ ) 'सहकारी संस्था' म्हणून परिषदेशीं जोडून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाचा राहील. ह्या दोन्ही तऱ्हेच्या संस्थांसंबंधीं अटी, नियम वगैरे करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

( २ ) साहित्याच्या उन्नतीसाठी स्थापन झालेल्या ज्या संस्थांना महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे हेतु व नियम मान्य असतील व ज्यांचे हेतु परिषदेच्या हेतूंशीं विसंगत नसतील, अशा संस्थांना त्यांच्याकडून मागणी आल्यास 'संलग्न संस्था' म्हणून जोडून घेण्यांत येईल.

( ३ ) संलग्न संस्थांनी नोंदणी आकार पांच रुपये द्यावा व पुढे दरवर्षी तीन रुपये वर्गणी द्यावी.

( ४ ) प्रत्येक संलग्न संस्थेला परिषदेच्या उद्देशास अनुसरून कार्यकारी मंडळाला सूचना करण्याचा हक्क आहे व कार्यकारी मंडळाने त्यांचा विचार करून आपला निर्णय कळवावा.

( ५ ) संलग्न संस्थांची अंतर्गत व्यवस्था व आर्थिक संबंध यांबद्दल महाराष्ट्र-साहित्य-परिषदेवर कोणत्याहि प्रकारची जबाबदारी नाहीं.

### सहकारी संस्था

( ६ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या संस्था, त्यांनी तशी इच्छा प्रदर्शित केल्यास, परिषदेशीं 'सहकारी संस्था' म्हणून जोडून घेण्याचा व त्यासंबंधी अटी वगैरे ठरविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

( ७ ) संलग्न व सहकारी संस्था नोंदून घेण्याचा अधिकार महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यकारी मंडळास आहे. मात्र अशा संस्था पटावरून कमी करणें झाल्यास त्यासंबंधीचा ठराव कार्यकारी मंडळाने नियामक मंडळाच्या सभेपुढे मंजुरीसाठी ठेवला पाहिजे.

## संलग्न व सहकारी संस्थांबाबत पोटनियम

### संलग्न संस्था

( १ ) परिषदेशीं संलग्न होऊं इच्छिणाऱ्या प्रत्येक संस्थेने परिषदेच्या घटनेंतील नियम ४९ प्रमाणे अर्ज करितांना खालील माहिती पुरविली पाहिजेः— (अ) संस्थेचे उद्देश, घटना व नियम, ( आ ) कार्यवाहांचीं नांवें, ( इ ) सभासदांची संख्या, व ( उ ) आजपर्यंतच्या कामगिरीचा हिशेबासुद्धा त्रोटक अहवाल.

( २ ) प्रत्येक संलग्न संस्थेने आपल्या वार्षिक कामाचा अहवाल दरवर्षी परिषदेच्या कचेरीकडे पाठविला पाहिजे. अशा अहवालांचा गोषवारा चिटणीसांकडून वेळोवेळीं ' पत्रिकें 'त प्रसिद्ध करण्यांत यावा.

( ३ ) संलग्न संस्थांची संख्या दहांवर गेल्यास निवडणुकीसाठी त्यांचे सोयीस्कर गट कार्यकारी मंडळाने पाडावे व त्या गटांत दहा प्रतिनिधींची वांटणी करून निवडणुकी कराव्यात.

( ४ ) जोपावेतों संलग्न संस्थांची संख्या दहाहून अधिक नाही तोंपावेतों प्रत्येक संस्थेस एक याप्रमाणे नियामक मंडळांत त्यांच्या प्रतिनिधींची संख्या असावी.

( ५ ) संलग्न संस्थांकडून निवडून येणारे प्रतिनिधी त्या त्या गटांतील कोणत्या तरी संलग्न संस्थांचे सभासद असले पाहिजेत.

( ६ ) संलग्न संस्थांस ' महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ' विनामूल्य मिळावी.

## सहकारी संस्था

( १ ) परिषदेशीं सहकारी होऊं इच्छिणाऱ्या प्रत्येक संस्थेने परिषदेच्या घटनेंतील नियम ५३ प्रमाणे अर्ज करितांना खालील माहिती पुरवावी:—( अ ) संस्थेचे उद्देश, घटना व नियम, ( आ ) कार्यवाहांचीं नांवें, ( इ ) सभासदांची संख्या, व ( उ ) आजपर्यंतच्या कामगिरीचा त्रोटक अहवाल. याशिवाय वेळोवेळीं सहकारी संस्थांनी आपले वार्षिक अहवाल व इतर साहित्यविषयक माहिती परिषदेस कळवावी.

( २ ) सहकारी संस्थांच्या बाबतींत नोंदणीची किंवा वार्षिक वर्गणी आकारण्यांत येणार नाही, व त्याचप्रमाणे नियामक मंडळांत प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्कहि त्यांस असणार नाही.

---

# साभार स्वीकार

**१ कालिदासः**— लेखक– प्रो. वा. वि. मिराशी, एम्. ए., नागपूर, प्रकाशक– सुविचार प्रकाशन मंडळ, लिमि; धनतोली, नागपूर.

**२ सारस्वतसमीक्षाः**— लेखक– य. र. आगाशे, एम्. ए., बी. टी., प्रकाशक– शि. गो. भावे, बी. ए., एल्एल्. बी, वाई, किं. २॥ रुपये.

**३ विष्णु कृष्ण चिपळूणकर** ( द्विविधदर्शन ):— लेखक– श्री. ग. त्र्यं. माडखोलकर व प्रो. श्री. ना. बनहट्टी, नागपूर, प्रकाशक– दि बॉम्बे बुक डेपो, मुंबई नं. ४.

**४ धर्मस्वरूपनिर्णयः**— लेखक व प्रकाशक— तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे, कैवल्यधाम, लोणावळें.

५ निवृत्ति विनोदः— लेखक– प्रो. अ. क. त्रिवेदी, बडोदा कॉलेज, बडोदें, प्रकाशक– धो. ना. विद्वांस, रावपुरा, बडोदें किंमत १॥ रुपया.

6 *Stories of Indian Saints* ( Vol. II ) By the late Dr. Justin E. Abbot and the late P. N. R. Godbole, Published by J. F. Edwards, United' Theological College, 7 Sholapur Road, Poona 1. Price Rupees Three.

७ श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांचा महाराष्ट्रांतील सत्कारः— लेखक– रा. शा. पाटील हुजूर कामदार, बडोदें, किंमत १ रुपया १० आणे.

८ महाराष्ट्र साहित्य संमेलन– अधिवेशन १८ वें (संपूर्ण अहवाल):— प्रकाशक– पु. दि. ढवळे, चिटणीस, म. सा. संमेलन, अधिवेशन १८ वें, नागपूर, किंमत १ रुपया.

९ प्रसून– [ कवितासंग्रह ]:— कवि– पां. रा. नंदुरबारकर व ना. वा. पुराणिक, प्रकाशक– वि. ग. गायकवाड, थ्युविली गार्डन, बडोदें, किंमत ६ आणे.

१० भारतीय चित्रकलाः— लेखक व प्रकाशक– श्री. बा. मा. दाभाडे, औंध, किंमत २ रुपये.

११ मालती– [ कवितासंग्रह ]:— कवि बा. मा. दाभाडे ( शशांक ), औंध, प्रकाशक— श्री. अ. य. देशपांडे, औंध, किंमत १० आणे.

१२ कविकुलगुरु कालिदासः— लेखक— श्री. के. ल. ओगले, बी. ए, प्रकाशकः— श्री. ग. गं. जांभेकर, 'लोकशिक्षण– लघुग्रंथमाला' ३३१ सदाशिव पेठ, पुणें २, किंमत १ रुपया.

१३ भंगलेलें देऊळः— लेखक— श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, प्रकाशक— श्री. मं. ना. कुलकर्णी, 'कर्नाटक हाऊस' चिरा बाजार, मुंबई २. किंमत १ रुपया ( साधी बांधणी ).

१४ यशोगंधः— कवि यशवंत, प्रकाशक–य. दि. पेंढारकर, ५६८ नारायण पेठ, पुणें २, किंमत १ रुपया.

१५ ज्ञानप्रदीपः— [ श्रीशिवदिन केसरी विरचित ] संपादक व प्रकाशक– प्रो. द. वा. पोतदार, बी. ए., पुणें, किंमत १ रुपया.भा. इ. सं. मं. पु., ग्रं. मा. क्र. ३३.

---

४६१

रत्न १८ शोधक—संपादक

## दकन इन्स्तिटुट

ज्ञानोदय, १–२–५३.

दकन इन्स्तिटुट या नांवाची मंडळी पुण्यामध्यें विद्यावृद्धि करण्याकरितां हल्लीं स्थापित झाली आहे. तिचे अध्यक्ष मेजर क्यांडी साहेब व चिटणीस रेवरेंड् फ्रेजर साहेब; आणि ब्यड्ज साहेब रेवरेंड मिचल साहेब वगैरे उपाध्यक्ष आहेत, आणि या मंडळीच्या हातून बराच उपयोग होईल अशी आशा आहे.

---

रत्न १९ शोधक—संपादक

## रेवरेंड डी. ओ. आलेन.

ज्ञानोदय, १५–२–५३.

हे साहेब या देशांत २५ वर्षांपेक्षां अधिक राहून फार मेहनतीनें त्यांनी काम चालविलें, परंतु हल्लीं प्रकृति वरी नाहीं सबब हवा पालटण्याकरितां या महिन्याच्या १२ व्या तारखेस आगबोटींतून स्वदेशास गेले. पुस्तकें व निबंध करणारी म्हणून जी मंडळी २५ वर्षांपूर्वी स्थापली गेली त्यांतील हे एक साहेब होते व त्या मंडळीच्या चिटणीसींचें काम त्यांनी पांच वर्षें चालविलें होतें. आणि बैबल सोसायटी म्हणजे ख्रिस्तीशास्त्र प्रसिद्ध करणारी जी मंडळी तिच्या चिटणीसींचें काम त्यांनी तेरा वर्षें केलें, आणि ख्रिस्ती शास्त्र मराठींत सुंदर रीतीनें तर्जमा होऊन तें छापलें जावें म्हणून त्यांनी फार मेहेनत केली. आणि कित्येक सुंदर मराठी पुस्तकें रचून छापविलीं. तसेंच प्रांतोप्रांतीं फिरून उपदेशाचें काम फार केलें. या साहेबांनी अमेरिकन मिशन छापखान्याचें काम नऊ वर्षेंपर्यंत फार मेहनतीनें केलें. आणि या देशांतील लोकांच्या कल्याणाकडे त्यांचें विशेष लक्ष होतें म्हणून त्यांच्या जाण्यामुळें कांहीं कांहीं नेटिवांस फार दुःख झालें असेल, यांत अगदीं संशय नाहीं. तर या साहेबांची प्रकृति आजपर्यंत बरी होती आणि पुढेंही ते लवकरच बरे होऊन येतील असी आम्ही आशा ठेवितों.

बैबल सोसायटीच्या मागल्या रपोटांत या साहेबांविषयीं लिहिलें आहे कीं अमेरिकन मिशनांतील रेवरेंड डी. ओ. आलेन साहेब यांनी सक्त मेहनत करून काम चालविलें त्यामुळें मंडळीवर यांचे फार उपकार आहेत, आणि यांनी निरोगी होऊन शास्त्र नीटपणीं छापण्याचें काम शेवटास न्यावें अशी आमची ईश्वरापासीं प्रार्थना आहे. आणि ते जेव्हां स्वदेशास जाण्यास निघाले तेव्हां त्या कमिटीने मानपत्र म्हणून कागद दिल्हा, त्याचा सारांश कीं तुम्ही २५ वर्षेंपर्यंत या मंडळीस मदत होऊन पुष्कळ चांगलीं कामें केलीं, तर आतां तुमचें ईश्वर कल्याण करो. तसेंच मुंबईतील मिशनेरी कान्फरेन्स मंडळीनेंही त्यांस बहुत योग्य लेख देऊन सांगितलें कीं तुम्हीं लवकर निरोगी होऊन यावे अशी आमची ईश्वराजवळ प्रार्थना आहे.

---

# संपादकीय निवेदन

## वर्षअखेर

या सातव्या वर्षाचा हा शेवटचा अंक होय. यांत सूचि वगैरे सर्व जोडलें आहे.

## साहित्यिक वृत्त पाठवा

आमच्या पहिल्याच निवेदनांत आम्ही वाचकांस व पत्रिकेच्या अभिमान्यांस कळकळीने विनंती केली होती की, पत्रिका ही सर्वांनी आपली समजून **साहित्यिक हालचालींचें वृत्त** परिषदेकडे अवश्य पाठवीत जावें म्हणजे त्याची **नोंद** पत्रिकेंत प्रसिद्ध करतां येईल. पत्रिकेकडे अद्यापि थोडींच पत्रें व मासिकें वगैरे भेटीस येतात. त्यामुळे व संपादकीय कचेरींत हें काम करून घेण्याची मनाजोगती सोय अद्यापि झाली नसल्याने आमची इच्छा पूर्ण करण्यास आम्हास स्वतंत्रपणेंच बातम्या व वृत्तपत्रें मिळण्याचें साहाय्य मागितलें पाहिजे.

## परतभेटीची विनंती

म. सा. पत्रिका जरी अद्यापि रोडकीशीच आहे तरी ती म. सा. परिषद या संस्थेची पत्रिका आहे. हें लक्ष्यांत घेऊन ज्यांचेकडून अद्यापि परतभेट आमच्या पत्रिकेकडे येत नाही त्या सर्वांनी पत्रिकेस भेट द्यावी अशी साग्रह विनंती आहे. भेटीस प्रतिभेट म्हणून पत्रिका अवश्य येईल व तशी ती न आल्यास इकडे तसें कळवावें.

## पत्रिकेवरील कांही आक्षेप

पत्रिकेवर असा एक आक्षेप घेण्यांत आलेला आम्हास कळला की, पत्रिका 'संशोधकी' असते. या आक्षेपांत कांही तथ्य आहे हें आम्हीहि कबूल करतों. तथापि हें पत्रिकेंतलें संशोधन म्हणजे इतिहाससंशोधनासारख्या संस्थांतून चालतें तेंच नव्हे. तेथे पेशवाईअखेर म्हणजे शके १७३९ नंतरचे विषय संशोधिले जात नाहीत; तर, येथे देण्यांत येणारा तसला मजकूर **इंग्रजी अमलांतील घटितांविषयी** असतो. वेताळ व पिशाच्च यांचीं जीं पत्रें रा. दाते यांनी मिळविलेलीं आम्ही छापिलीं तीं इंग्रजी अमलांतील विनोदी साहित्याचा इतिहास अभ्यासणारास फार उपयोगी पडणारीं आहेत. 'ज्ञानप्रकाश' पत्रांत तीं आलीं त्याला आता साठ वर्षें होऊन गेलेलीं आहेत. आता ते अंक इतके दुष्प्राप्य झाले आहेत की, ते अप्राप्य आहेत म्हटलें तरी चालेल. हें अप्राप्य साहित्य प्रसिद्ध करण्याचा मान व संधि पत्रिकेस लाभली याचा आम्हास तरी अभिमान वाटतो. 'रद्दींतील रत्नें' जीं आम्ही स्वतः निवड-

लेलीं छापितों तीं पत्रिकेच्या मोकळ्या सुटावयाच्या जागेंतच शक्य तोंवर छापवितों. हेंहि साहित्य दुर्मिळ, उपयुक्त व मनोरंजक असेंच आहे. असें साहित्य छापल्यामुळे पत्रिकेच्या अंकास किती महत्त्व चढलें आहे हें सूक्ष्म अभ्यासी जनांस सहज पटण्यासारखें आहे.

असें आहे तथापि पत्रिकेचें ' संशोधकी ' स्वरूप आम्हास ठेवावयाचें नाही. आम्हास पत्रिका कशी असावी असें वाटतें तें **नवें धोरण** आम्ही पत्रिकेंतच वर्ष ७ अंक १ मध्ये प्रसिद्ध केलेंच आहे. त्याहि धोरणाचें अनुसंधान आम्ही हळूहळू साधण्याचें खटपटींत आहों. ती जुळवाजुळव सर्व नव्यानेच करावयास पाहिजे आहे. ' संन्याशाच्या मुंजीला शेंडीपासून तयारी '—तसा प्रकार आहे

आर्थिक अडचणींचाहि विचार करावयास कोणी विसरतां कामा नये. पत्रिका रोड झाली याचें कारण तिचा खुराक तुटला किंबहुना तोडावा लागला. दम धरून नेटाने चालल्यास जसें म. सा. परिषदेचें बळ वाढेल तसें पत्रिकेचेंहि बाळसें वाढेल.

पत्रिकेवर आणखी एक आक्षेप परवा बडोदें संमेलनप्रसंगीं घेण्यांत आला. त्यावेळी आम्ही समक्ष उपस्थित नव्हतों. नाही तर त्याचें निराकरण जागच्याजागींच आम्हास करता आलें असतें. आक्षेप असा की, पत्रिकेंतहि अश्लील मजकूर दाखवून देतां येईल. पत्रिका न वाचणाऱ्यांचा हें विधान वाचून निःसंशय गैरसमज होईल. आक्षेपकांनी मोघमच आरोप केला असें दिसतें. पण आमचा तर्क जर बरोबर असेल तर त्यांचा रोख वेताळ व पिशाच्च यांच्या पत्रांवर असावा असें दिसतें. हीं साठ वर्षांपूर्वी लिहिलेलीं पत्रें केवळ त्यावेळच्या एका विनोदी लिहिण्याचा नमुना कळावा म्हणून व तो नष्ट होऊं नये म्हणून मुद्दाम छापलीं. छापतांनाच या पत्रांचे संपादक रा. दाते यांनी आरंभीच असा इषारा दिला आहे की,—

" कित्येक ठिकाणीं मात्र लेखक बेफाम होऊन सभ्यपणाच्या मर्यादा उल्लंघीत असलेला दिसतो. त्याकडे वाचक कृपेने काणाडोळा करतील अशी आशा आहे. " ( वर्ष ७ अंक २ पृ. २८३ ).

वरील खुलासा पुरेसा आहे असें आम्हास वाटतें. कोणीहि समंजस वाचक या बाबतींत संपादकास दोषी समजणार नाहीत अशी आमची खात्री आहे.

## महाराष्ट्रशारदाकार व म. सा. परिषद्

मुंबईस नवीनच निघालेलें एक मासिक महाराष्ट्रशारदा नांवाचें आहे. त्याच्या फेब्रुवारीच्या अंकांत ' हिंदुस्थानी ॲकॅडमी ' या उपयुक्त संस्थेची माहिती दिली आहे आणि त्या संस्थेची, तिच्या कामगिरीची आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कामगिरीची सटीक तुलना करण्याचा प्रयत्न केला आहे. संपादकांची कळकळ वाखाणण्यासारखी आहे. परंतु दुसऱ्याला अभ्यास करण्यास शिकविण्याची व त्यास अज्ञान समजून टोले देण्याची त्यांची ऐट हास्यास्पद ठरल्यावांचून रहाणार नाही.

हिंदुस्थानी ॲकॅडमी या महनीय संस्थेची माहिती आम्हासहि थोडीफार आहे. त्याप्रमाणे पाहतां रायराजेश्वर वली हे शिक्षणमंत्री असतांना त्यांनी उदारतेने स्वतः मोठी देणगी देऊन सरकारी मदतहि मिळवून वरील ॲकॅडमीची स्थापना केली व तिचें कार्य उत्तम प्रकारें चालू आहे. हिंदुस्थानी ॲकॅडमीशीं शारदाकर्त्यांनी म. सा. परिषदेची तुलना केली आहे ती मूळांतच चूक आहे. तुलनाच करावयाची तर हिंदुस्थानी ॲकॅडमी व म. सा. परिषद् यांची न करितां, हिंदी-साहित्य-संमेलन व म. सा. परिषद् यांचीच करणें युक्त ठरलें असतें. सरकारी मदतीने चालणारी ॲकॅडमी व लोकाश्रयावर, वार्षिक वर्गण्यांवर व बहुमतावर अवलंबून चालणारी म. सा. परिषद् ही निराळी. ॲकॅडमी, युनिव्हर्सिटी व परिषद् किंवा संमेलन या तिन्ही संस्था घटनादृष्ट्या अगदी वेगळ्या जातीच्या असतात, त्यामुळे त्यांच्यांत परस्पर तुलना करणें अन्यायाचें व अप्रयोजक आहे.

हिंदुस्थानी ॲकॅडमी निराळी व हिंदी साहित्यसंमेलन निराळें. आणि म. सा. परिषदेची तुलना या दोहोंतून जर कोणा एखाद्याशीं करावयाची असेल तर ती हिंदी-साहित्य-संमेलनाशींच करणें योग्य होईल. कारण हिं. सा. संमेलन व म. सा. परिषद् यांच्यांत उद्देश-साम्य व घटनासाम्य अधिक आहे.

हिंदी-साहित्य-संमेलनाचेहि मोठमोठे सोहाळे भरत असतात. आणखी दोनच महिन्यांनी हिंदी-साहित्य-संमेलनाचा वार्षिक सोहोळा इंदुरास भरणार आहे. याच इंदूरच्या 'वीणा' मासिक पुस्तकांतील पुढील उद्गार म. शारदाकर्त्यांनी या प्रकरणीं विचारांत घ्यावेः—

हिन्दी-साहित्य-सम्मेलन को स्थापित हुए लगभग २५ वर्ष हो गये हैं, परन्तु अभी वह उस अवस्था में भी नहीं पहुँचा जिस अवस्था में १९२२ के पूर्व कांग्रेस थी या जिस रूप में आज भी सनातनधर्म या आर्य-समाज के उत्सव होते हैं। अधिवेशन के समय साहित्यक विचारों को स्थान नहि मिलता। सच पूछा जाय तो सम्मेलन में उपस्थित होना कुछ लोगों को व्यर्थ जान पडता है। कारण, वहाँ सभापति के भाषण के अतिरिक्त कुछ नहीं होता और वह घर बैठे भी पत्रों में पढने को मिल सकता है। लोगों का समय व्यर्थ जाता है। उधर प्रयाग के कुछ लोगों का खयाल है कि सम्मेलन का कार्य चलाने के लिये अधिक से अधिक रुपया मिलते ही सम्मेलन का अधिवेशन सफल हो जाता है। वास्तव में ये सब बातें सम्मेलन को निष्प्राण करने में सहायक हैं। सभापति के उम्मीदवार वृद्ध साहित्य-सेवी सम्मेलन में उपस्थित होना अपनी प्रतिष्ठा के विपरीत समझते हैं और नवयुवक लोग सम्मेलन को कुछ महत्त्व नहि देते, ऐसी दशा में सम्मेलन के कर्णधारों का क्या यह कर्तव्य नहीं था कि वे सबको संगठित करने का प्रयत्न करते? उन्होने तो कुछ लोगों को एकत्रित करके कई प्रस्ताव पास कर लेना और साल भर के कार्य के लिये रुपया एकत्र कर लेना ही अपना कर्तव्य समझ रखा है। [सप्टेंबर १९३४—'वीणा']

हिंदुस्थानी अॅकॅडमीसारखी **मराठी अॅकॅडमी** काढण्याची खटपट ग्वालेरचे श्रीमंत चंद्रोजीराव आंग्रे यांनी ग्वालेर संमेलनाचे वेळीं केली होती. श्रीमंत आंग्रे-साहेब यांस 'रत्नाकरा'तून आम्ही त्याच वेळीं विनंती केली होती कीं, जर श्रीमंत स्वतः मराठी अॅकॅडमीसाठी झोळी घेऊन भिक्षा मागतील तर त्यांचें संकल्पित मूर्त स्वरूपांत उभें राहिलेलें त्यांस दिसेल. परंतु दुर्दैवानें वरील लेखाचे शेवटीं आम्ही म्हटल्याप्रमाणे 'बोलणें फोल झालें आणि डोलणें वायां गेलें!' वरील अॅकॅडमीच्या स्थापनेसाठी ग्वालेर संमेलनानें एक समिति नेमली होती. आम्ही त्या समितीवर होतोहि. म. सा. परिषदेवर संमेलनास जमलेल्या सज्जनांचा मोठा रोष तेथे दिसून आला. परंतु संमेलनाच्या उत्साहाचा पूर ओसरतांच सर्व रान पूर्ववत् रेताड झालें! ग्वालेरीस म. सा. परिषदेचें कोणी नांव घेऊं देईना! गैरसमज व अनास्था यांचा संयोग होऊन आशेचे ढग आकाशांत ओरडत होते ते कोरडेच गेले! म. शारदाकर्त्यांनी हा इतिहास लक्ष्यांत घेऊन मगच म. सा. परिषदेस दूषणें द्यावयाचीं होतीं! मराठी अॅकॅडमी काढण्यासाठी पुढे सरसावलेल्या वीरांस त्यांनी हटकलें असतें तर तें शोभलें असतें! गरीब बिचाऱ्या म. सा. परिषदेला धोपटण्यांत काय पुरुषार्थ?

डेक्कन् व्हर्नॅक्युलर ट्रान्स्लेशन् सोसायटीशीं सहकार्य कां करीत नाही असा दुसरा एक आक्षेप म. शा. कर्त्यांनी घेतला आहे. तेथेहि असाच असमंजसपणा त्यांनी दाखविला आहे. कोण सहकार्य करीत नाही? म. शा. कर्ते लिहितात "तिला आत्म-सात् करणें शक्य व इष्ट असतां ती एक जातिबाह्य संस्था आहे असें का मानावें!" याला लिहिणें म्हणण्यापेक्षा खरडणें म्हणणें ज्यास्त शोभेल. डे. व्ह. ट्रा. सो. चेहि आम्ही कैक वर्षें आजीव सभासद व परीक्षक असून बरीच वर्षें कार्यकारी मंडळाचेहि सभासद होतों. डे. व्ह. ट्रा. सो. व म. सा. परिषद् यांच्यामध्ये कसलाहि बेबनाव वा तंटाबखेडा नाहीं. या जुन्या व उपयुक्त संस्थेला 'जातिबाह्य' समजण्याचें कारण तरी काय? कोण तसें समजतो? उलट अशा सर्व साहित्य-संस्था एका कायमच्या इमारतींत नांदाव्या म्हणून आम्ही स्वतः सुमारें ५।७ वर्षें यथाशक्ति धडपडत आहोंत. सर्वांची आम्हांस सहानुभूति आहे, परंतु नियमांच्या व आर्थिक स्वरूपाच्या वगैरे इतर अडचणी आहेत त्या विसरून चालतां येत नाही. पुणें मराठी ग्रंथालय, महाराष्ट्र शारदा मंदिर, म. सा. परिषद्, डे. व्ह. ट्रा. सोसायटी या सर्व संस्था स्वतंत्र राहून एकसंस्थ होणें शक्य आहे असें आम्हास वाटतें. त्या तशा न झाल्या तरी सहकार्य कर-ण्यास त्या केव्हांहि सिद्धच सापडतील असें आम्ही स्वानुभावाने सांगतों. कारण आम्ही स्वतः या सर्वांचे बरेच जुने सदस्य असून त्यांच्या कार्यकारी मंडळावरहि बरेच वेळां होतों किंवा आहोंत.

सरकारी मदतीचें म. सा. परिषदेस किंचित्हि वावडें नाही. पण अलीकडे अशी मदत मिळणें किती दुरापास्त झालें आहे हें म. शा कर्त्यांस माहीत नाही हें पाहून खेद वाटतो. खुद्द डे. व्ह. ट्रा. सोसायटीस सुद्धा सरकारी मदत मिळत होती.

तितकीहि मिळत राहण्याची भीति वाटते. मग अधिक किंवा नवी मदत त्यांस किंवा नव्या संस्थांस मिळणें दूर तरी अशक्यच समजलें पाहिजे.

डे. व्ह. ट्रा. सोसायटी 'आत्मसात्' करण्याची धडपड करणें हें मात्र तिच्या सुसूत्र कारभारांत व्यर्थ खीळ घालण्यासारखें होणार आहे. म. शा. कर्त्यांचे हेतु फार चांगले आहेत. परंतु म. सा. परिषदेचें आर्थिक बळ वाढून तिचें प्रातिनिधिकत्व जेव्हा तिचे सभासद होऊन सर्वांनी वाढवावें तेव्हाच तिचें महत्त्व, दर्जा, अधिकार व सत्ता हीं वाढीस लागतील; एरव्ही नाही. यास्तव म. शा. कर्त्यांस आमची विनंती आहे की, त्यांनी तसा उपदेश आपल्या शारदेकडून करवावा.

म. शा. कर्ते असें सुचवूं इच्छितात की, म. सा. परिषदेने "सरकार किंवा इतर संस्था यांना उद्देशून केलेल्या ठरावांच्या नकला सरकार किंवा संबद्ध संस्था यांना पाठविल्याहि नाहीत"! म. शा. कर्त्यांस आम्ही नम्रपणें एवढेंच कळवूं इच्छितों की, ही त्यांची माहिती चुकीची आहे. ते फार मागे आहेत-झोपेंत आहेत! पूर्वीच्या अमदानींत तशी ढिलाई झाली असेल परंतु कोल्हापूर संमेलनापासून तरी असा गबाळपणा म. सा. परिषदेकडून झालेला नाही. म. शा. कर्त्यांनी पोष्टाच्या ठरावाचें उदाहरण दिलें आहे. याबद्दल आम्ही सांगूं इच्छितों की, या पोष्ट तक्रार प्रकरणींहि असेंब्लींत शक्य ती खटपट झाली परंतु तिचा प्रत्यक्ष परिणाम बालिष्ठ सरकारावर अत्यल्पच झाला! म. सा. परिषदेला या प्रकरणीं यापेक्षा जास्ती कांही करतां आलें नाही. तिचा आळस किंवा अनास्था या प्रकरणीं नाही. रा. चव्हाणांसारखे कळकळीचे गृहस्थ या कामीं नेटाने खटपट करीत आहेत व त्यांस म. सा. परिषद् पाठिंबा देत आहे व देईल.

इतर प्रांतांना महाराष्ट्रापासून 'स्फूर्ति' मिळाली किंवा नाही, या वादांत दूर आम्ही शिरत नाही. आम्ही येवढेंच येथे सांगूं इच्छितों की, म. सा. परिषदेच्या पत्रकांत जीं वाक्यें यासंबंधांत आहेत त्यांत 'तोरा' किंवा 'शेखी' मिरविण्याची बालिश इच्छा नाही. महाराष्ट्राकडे आद्यत्वाचा किंवा जनकत्वाचा मान येत असेल, तर अनुजांच्यापेक्षाहि तो मागे पडत चालला आहे याची जाणीव त्यास व्हावी हाच हेतु या विधानांच्या बुडाशीं आहे. परंतु या विधानांनी म. शा. कर्त्यांसारख्यांचा जर गैरसमज होत असेल तर त्याचा संभव नष्ट होईल अशी वाक्यरचना उपयोजावी हें योग्य होईल. हीं वाक्यें म. सा. परिषदेच्या कार्यप्रसारक पत्रकांत आहेत. कोठे घटनेंत व इतिहासांत दिलेलीं नाहीत. नवीं पत्रकें काढतांना म. शा. कर्त्यांनी घेतलेला वरील आक्षेप लक्ष्यांत घेऊन मांडणी केल्यास त्यांची तक्रार नाहीशी होईल.

अखेर 'म. सा. परिषदेजवळ द्रव्य नाही असेंहि नव्हे' असेंहि एक विधान म. शा. कर्त्यांनी केलें आहे. त्यावरून म. सा. परिषदेच्या आर्थिक स्थितीबद्दल खरी कल्पना वाचकांस येण्यास हरकतच होईल असें आम्हास वाटतें. म. सा. परिषदेस सांप्रत निधिपांकडून फक्त सालिना सुमारें ५००।६०० रुपये व्याज मिळतें तेवढेंच

कायम उत्पन्न आहे! हिंदुस्थानी ॲकॅडमीस सरकारी मदत हजारो रुपयांनी सालिना होते.

म. शा. कर्त्यांनी विरोधी टीका का होईना पण करून हा विषय जनतेपुढे सद्धेतुपूर्वक मांडला याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. म. सा. परिषदेची ' कार्य-शक्ति ' वाढवावी अशी मंगल इच्छा मनांत वागविणारे म. शा. कर्त्यासारखे° सज्जन देखील म. सा. परिषदेबद्दल खरी व विश्वसनीय माहिती न पाहतां व मिळवितां आक्षेप घेण्यास कसे सहज प्रवृत्त होतात व इच्छा नसतांहि म. सा. परिषदेवर नसते दोष कसे लादतात हें आजच्या प्रसंगामुळे आमच्या नजरेस आलें.

वास्तविक जवळ पंचवीस तीस लाखांचा कुणगा करून ठेवणारी आपल्याच गांवची–मुंबापुरीची–युनिव्हर्सिटी हीसच तिने मराठी किंवा देशी साहित्यासाठी काय केलें याचा जबाब म. शा. कर्त्यांनी विचारावयास पाहिजे होता. हिंदुस्थानी ॲकॅडमीचें काम विचारांत घेतलें त्यावेळीं म. शा. कर्त्यांनी बडोद्याचे सुविद्य अधिपति श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांनी आजवर जीं पुस्तकें छापविलीं व मराठी साहित्योत्तेजनाच्या ज्या योजना केल्या त्यांचा विचार तुलनेसाठी करणें वावगें ठरलें नसतें. विद्वानांना मानद्रव्य व पदव्या वगैरे देण्याचा श्रीमंतांचा नवा उपक्रम सर्वश्रुतच आहे. आणि मराठी–गुजराती ॲकॅडमीहि काढण्याची योजना त्यांनी तयार करविली असून श्रीमंत महाराज त्याचा विचार करीत आहेत ही गोष्टहि बडोदासंमेलनाचे स्वागताध्यक्ष सेनापति नानासाहेब शिंदे यांच्या भाषणांत उल्लेखिलेली आहे. तिकडे म. शा. कर्त्यांनी लक्ष्य पुरवावयास पाहिजे होतें. मराठी साहित्याचें दैन्य फेडण्याचें सामर्थ्य सुदैवाने श्रीमंत महाराजांचे ठायीं आहे. तिकडे आपली लेखणी म. शा. कर्त्यांनी वळवावी अशी त्यांस आमची सूचना आहे!

इंदूरच्या श्री. सवाई तुकोजी महाराजांनी उदारपणाने दहा हजार रुपये म.सा. परिषदेस दिले. परंतु बडोदा, ग्वालेर, कोल्हापूर येथील महाराजांनी म्हणण्यासारखी कांहीच कृपा परिषदेवर अद्यापि केलेली नाही. म. सा. परिषदेची ही आशा फलद्रूप व्हावी म्हणूनहि जर म. शा. कर्ते आपली लेखणी शिणवतील तरीहि आम्ही त्यांचे आभारी राहूं.

## बडोदें येथील संमेलन

बडोदें येथे एकोणिसावें महाराष्ट्र साहित्यसंमेलन यथासांग पार पडलें. एका नवीन ठरावान्वयें या संमेलनाचा वृत्तांत म. सा. परिषदेच्या द्वाराच प्रसिद्ध व्हावा असें ठरलें आहे. बरीच वर्षें आम्ही हें सुचवीत होतों. बडोद्यास परभारें बडोदेकर मित्रांनीच हा हेतु दर्शविला हें उत्तम झालें. कदाचित् पुढील अंकाचे वेळापर्यंत संमेलनाचा वृत्तांत तयार होऊन पुस्तकरूपाने छापण्यास जाईल, न जाणों छापूनहि होईल, अशी आम्हास आशा वाटत आहे. यास्तव त्याबद्दल येथे कांही अधिक लिहीत नाही.

---

# नियामक मंडळ

## (१) अधिकारपरत्वें सभासद

१ श्री. स. मा. वि. किबे, (अध्यक्ष), इंदूर
२ प्रो. वा. म. जोशी, (उपाध्यक्ष), पुणें
३ श्री. न. चिं. केळकर, ( ,, ), पुणें
४ प्रो. पां. वा. काणे, (उपाध्यक्ष), मुंबई
५ श्री. चिं. वि. वैद्य, ( ,, ), मुंबई

## (२) स्वीकृत सभासद

७ श्री. चिं. ग. कर्वे, पुणें
८ प्रो. दे. द. वाडेकर, पुणें
९ प्रि. ध. रा. गाडगीळ, पुणें
१० प्रो. रा. श्री. जोग, सांगली
११ श्री. य. रा. दाते, पुणें
१२ प्रो. दा. ग. पाध्ये, नाशिक
१३ प्रि. प्र. के. अत्रे, पुणें
१४ श्री. रा. दा. देसाई, पुणें
१५ श्री. रा. ग. हर्षे, पुणें
१६ श्री. द. अ. तुळजापूरकर, मुंबई

## (३) प्रादेशिक सभासद

१७ रे. भा. कृ. उजगरे, सासवड
१८ श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी
१९ श्री. वि. द. घाटे, अहमदाबाद
२० श्री. नी. शं. नवरे, सोलापूर
२१ श्री. दे. ना. टिळक, नाशिक
२२ श्री. वा. ना. फडणीस, जळगांव
२३ श्री. शं. श्री. देव, धुळें
२४ श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर
२५ श्री. ज. वि. लेले, अलिबाग
२६ श्री. र. कृ. पाटणकर, राजापूर
२७ श्री. कृ. पां. कुलकर्णी, सातारा
२८ प्रो. द. वा. पोतदार, पुणें
२९ प्रो. वा. गो. मायदेव, पुणें
३० श्री. शं. के. कानेटकर, फलटण
३१ श्री. श्री. दा. सातवळेकर, औंध
३२ श्री. ना. म. भिडे, भोर
३३ श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई
३४ श्री. ज. र. घारपुरे, मुंबई
३५ श्री. गं. दे. खानोलकर, मुंबई
३६ श्री. के. ना. काळे, मुंबई
३७ श्री. वा. ल. चिपळूणकर, अकोला
३८ डॉ. भा. म. टेंबे, यवतमाळ
३९ श्री. बा. ग. खापर्डे, उमरावती
४० श्री. या. मा. काळे, बुलढाणा
४१ प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर
४२ प्रो. श्री. ना [illegible]हट्टी, नागपूर
४३ प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर
४४ श्री. के. वि. फगसे, सिहोरा
४५ श्री. गो. अ. ओगले, नागपूर
४६ श्री. दे. ल. महाजन, नांदेड
४७ श्री. का. सी. वैद्य, हैद्राबाद
४८ श्री. त्रिंबकराजा बहादुर, हैदाबाद
४९ श्री. पां. वा. जोशी, हैद्राबाद
५० प्रो. श्री. रा. पारसनीस, सातारा
५१ प्रो. मा. लिं. पटवर्धन, कोल्हापूर
५२ श्री. गो. शि. उपळेकर, कोल्हापूर
५३ श्री. द. व्यं. पै, मडगांव
५४ डॉ. के. वा. साठे, बेळगांव
५५ श्री. भा. रा. पटवर्धन, धारवाड
५६ दि. ब. अ. बा. लठ्ठे, बेळगांव
५७ प्रो. चिं. वि. जोशी, बडोदें
५८ श्री. ग. वा. मावळणकर, अहमदाबाद
५९ रा. सा. र. ल. जोशी, सुरत
६० सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदूर
६१ प्रो. वा. गो. ऊर्ध्वरेषे, इंदूर
६२ श्री. वि. सी. सरवटे, इंदूर
६३ प्रो. गं. गो. कानेटकर, जबलपूर
६४ प्रो. प्र. वा. बापट, ग्वाल्हेर
६५ प्रो. व. ग. खापर्डे, बनारस
[illegible] गं. जांभेकर, पुणें
[illegible] आवारकर, कलकत्ता
[illegible]सबुद्धे, मद्रास

# महाराष्ट्र साहित्यांत नवीन उत्कृष्ट भर

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचीं पहिलीं चार वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षवार बांधलेलीं चार पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, ऐतिहासिक, चरित्र, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक, शंकाचर्चा, सामाजिक इत्यादि विषयवार सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, इतिहास यासारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**भाषिक**—प्राकृत, मराठीचे कालिक व प्रांतिक भेद, म्हणी; पारिभाषिक शब्द; विविध शब्दसंग्रह; व्याकरण; व्युत्पत्ति; लिपी; जुने गद्य–पद्य इ०

**सामाजिक**—जुन्या कथा; गाणीं; सामाजिक टांचणें; खेळ; तोडगे; व्रतें; संस्कारपद्धती; जुन्या चालीरीती; जातींची माहिती इ०

**निबंध**—कृषिशास्त्र; भूघटना; आयुर्वेद; तत्त्वज्ञान; वेद; काव्य इत्यादि विषय.

**ऐतिहासिक**—अलीबहाद्दरांस पत्रें; शिलालेख; शालिवाहन शक; पत्रें; हकीकत तालुके रायगड; पेशवाईच्या सावलींत; बोधले घराणें बखर इ०

**चरित्र**—अश्वघोषाचें बुद्धचरित्र; वि. का. राजवाडे; वि. कों. ओक इ०

**ग्रंथ**—निरुक्ताचें भाषांतर; मराठी वाङ्मयाचा इतिहास; भांडीरभाषा व्याकरण.

**शंकाचर्चाः**—यांत शब्द, वाक्यरचना, प्रचार, व्युत्पत्ति, गाणीं इ. अनेक गोष्टींवर शंकाचर्चा आल्या आहेत.

**पुस्तकपरीक्षणः**—कांहीं महत्त्वाच्या ग्रंथांवर पांडित्यपूर्ण विस्तृत टीका असून हा भाग परीक्षणक्षेत्रांत अगदी नवीन आहे. मराठी वाङ्मयाचें एक स्वतंत्र दालन यामुळे नवीन उघडलें गेलें आहे.

**किंमतः**—सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह; दर वर्षाच्या पुस्तकास ३ रुपये; एकदम पहिल्या चार वर्षांचीं पुस्तकें १० रु. स. ट. ह. निराळा.

**वि. सू.**—पांचव्या वर्षाच्या पुस्तकाच्याहि बांधीव प्रती तयार आहेत. परंतु या प्रतीस प्रत्येकीं ४ रुपये पडतील. ट. ख. वेगळा.

चिटणीस, म. सा. परिषद्, पुणें.

---

आर्यसंस्कृति-मुद्रणालय, चिमण[illegible] [illegible]करस्ता, पुणें येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-[illegible] कार्यालयात (१९६ [७९] सदाशिव पेठ, पुणें २) परिषदे[illegible] [illegible]ंकर यांनी प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका

